






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






**महाराष्ट्र राज्य शासनाचा सन २०१७ या वर्षाकरिता**
**उत्कृष्ट मराठी वाङ्मय निर्मितीसाठी स्व. यशवंतराव चव्हाण**
**राज्य वाङ्मय पुरस्कारासाठी प्रौढ वाङ्मय-काव्य प्रकारातील**

**'कवी केशवसूत पुरस्कार प्राप्त कवितासंग्रह**

# ऋतूपर्व






शशिकांत हिंगोणेकर

"आजपर्यंत दलित कवितेत किंवा मराठी कवितेत सामाजिक भान असलेला कवी प्रेमकविता चांगली लिहू शकतो की नाही यावर मराठी अभ्यासकांची मतमतांतरे आहेत. शशिकांत हिंगोणेकर हे वैविध्यपूर्ण कविता लिहिणारे कवी आहेत. सामाजिक चळवळीत असलेला कार्यकर्ता हा प्रेमसुद्धा करत असतो. त्याने साहित्यातून सामाजिक भानाबरोबरच प्रेमभावनाही व्यक्त करायला पाहिजेत, या जाणीवेचे कवी शशिकांत हिंगोणेकर आहेत. प्रेम ही भावना वर्ज्य मानून काही संकुचित वृत्तीने मराठी समीक्षेने या कवितेकडे पाहिले आहे. दलित कवी हा प्रेम कविता लिहू शकत नाही किंवा सामाजिक कवी प्रेम कविता लिहू शकत नाही असा शिक्कामोर्तब करण्याच्या परंपरेला शशिकांत हिंगोणेकर यांची कविता ही छेद देणारी आहे; त्याचे कारण मानवी जीवनात प्रेम ही अपरिहार्य बाब आहे. सामजिक भानाबरोबर जीवनाची प्रेमात्मक बाजूही महत्त्वाची आहे. आठवणींच्या गावामध्ये रमणारे कवीमन आपणांस या कवितांमधून भेटते. या काव्यसंग्रहातून दिसतो तो आपणास तरल, कोमल प्रेमभाव, प्रियकराचे समंजस व्यक्तिमत्त्व, त्याची समजून घेण्याची वृत्ती, स्वभाव, वाट पाहण्याचा संयम. प्रेमाची जीवनातील अपरिहार्यता, एकमेकांविषयी असलेली बांधिलकी, सशक्तपणे व्यक्त होणारे अनुभव, मनामनातील असणारे कंगोरे, वादळांना सामोरे जाण्याची वृत्ती, दुर्दम्य आशावाद, आपल्या अस्तित्वाचा शोध, प्रेयसीच्या अस्तित्वाची चाहूल, कात टाकून नव्याने जगण्याची वृत्ती, अनोख्या प्रदेशाची सफर, काळाचे महात्म्य, आप्तपरकीयांची जाणीव, गूढ स्वप्नांचा प्रदेश, सहज आंतरिक संवाद ही या कवितेची वैशिष्ट्ये आहेत. नव्या जीवन शैलीनुसारही कवी व्यक्त होतो आहे हे विशेष आहे."

**- प्रा. डॉ. बाळासाहेब लबडे**




सुविद्या प्रकाशन

१४९, शनिवार पेठ, पुणे ४११०३०.
© ऑफिस.२४४५४८९३.निवास: २४३४६३४३.




अंक क्र. ३६४, ऑक्टोबर-डिसेंबर २०१८



संपादक
**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती
**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**



प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका










मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात व्यवस्थापक
**वि. दा. पिंगळे**
९८८१२३५०३३

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अनुश्री भागवत**

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३६४
ऑक्टोबर-डिसेंबर २०१८



# अंतरंग



संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे



# साहित्य संमेलनाध्यक्षपदी डॉ.अरुणा ढेरे : एक उत्तम घटना

हाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या ऑक्टोबर-डिसेंबरच्या अंकाची जुळणी चालू असताना मनाला समाधान वाटावे अशा काही घटना साहित्यव्यवहारामध्ये घडल्या. त्यांपैकी एक ज्येष्ठ कवयित्री, संशोधक, समीक्षक आणि आदिबंधात्मक समीक्षेच्या अभ्यासक डॉ. अरुणा ढेरे यांची निवड यवतमाळ येथे होणाऱ्या ९२व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाध्यक्षपदी एकमताने झाली ही होय. अरुणा ढेरे यांना साहित्य संशोधनाचा वारसा वडिलांकडून, डॉ. रा. चिं. ढेरे यांच्याकडून लाभलेला असला तरी त्यांनी स्वतःची वेगळी वाट तयार केली आहे. मराठी साहित्यातील कथा, कादंबरी, ललित लेख, अनुवाद, समीक्षा लोकसाहित्यविषयक, सामाजिक इतिहासपर, किशोरांसाठी आणि कुमारांसाठी असं चतुरस्र लेखन त्यांनी केले आहे. त्यांचा 'विस्मृतिचित्रे' हा ग्रंथ त्यांच्या व्यासंगी प्रतिभेचे दर्शन घडवितो. 'स्त्री-लिखित मराठी कविता', 'स्त्री-लिखित मराठी कादंबरी' ही संपादने स्वातंत्र्योत्तर काळातील स्त्रियांच्या मराठी साहित्यातील योगदानाचा वाङ्मयइतिहास आहे. डॉ. अरुणा ढेरे यांचा मुख्य वृत्तिविशेष काव्य हा आहे. एक संवेदनशील आणि मानवी नातेसंबंधांवर प्रगल्भ भाष्य करणारी कवयित्री म्हणून डॉ. ढेरे मराठी वाचकांना परिचित आहेत. 'प्रारंभ', 'यक्षरात्र', 'मंत्राक्षर', 'जावे जन्माकडे' या काव्यसंग्रहांतून जीवन उत्कटपणे, समरसून जगताना मानवी भावभावना आणि त्याला साथ देणारा निसर्ग प्रत्ययाला येतो. 'काळोखाचे कवडसे' या पुस्तकातून त्यांनी केलेले आदिबंधात्मक समीक्षेविषयीचे सिद्धांतन आणि उपयोजन संशोधकांना आणि रसिक वाचकांना या समीक्षापद्धतीविषयी मर्मदृष्टी देणारे आहे. डॉ. अरुणा ढेरे साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष झाल्याने त्यांच्या निरलस, निरपेक्ष आणि व्यासंगी साहित्यसेवेचा सन्मान झाला आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेने त्यांचे नाव सुचविले होते. त्यांच्या नावाला अखिल भारतीय महामंडळाच्या सर्व सदस्यांनी अनुमती देऊन सन्माननीय निवड केली, याचा विशेष आनंद आम्हाला होत आहे. एक नवी सुरुवात या निवडीने झाली असून यापुढेही निवडणुकीपेक्षा एकमताने हा सन्मान गुणवत्तापूर्ण साहित्यनिर्मिती करणाऱ्या विदग्ध साहित्यिकांना देण्यात यावा. निवडून येण्याची पात्रता यापेक्षा सकस साहित्यनिर्मिती हा एकमेव निकष संमेलनाध्यक्षपदासाठी महत्त्वाचा मानला गेला. ही स्तुत्य घटना आहे. यापुढे अशा मान्यवरांना हा सन्मान नम्रतापूर्वक देताना ज्येष्ठतेचाही विचार व्हावा ही महामंडळाकडून अपेक्षा आहे. मा. डॉ. अरुणा ढेरे यांचे मनःपूर्वक अभिनंदन! महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या ठाम













भूमिकेमुळे ही निवड निवडणुकीऐवजी सन्मानाने झाली याबद्दल प्रा. जोशी तसेच प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे आणि विनोद कुलकर्णी हे प्रशंसेस प्रात्र आहेत. त्यांचेही अभिनंदन! मुखपृष्ठासाठी संमेलनाध्यक्षा मा. अरुणा ढेरे यांचे प्रकाशचित्र प्रसिद्ध छायाचित्रकार श्री. मिलिंद ढेरे यांनी दिले. याबद्दल महाराष्ट्र साहित्य परिषद आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक मंडळ श्री. मिलिंद ढेरे यांचे आभारी आहे.

ज्येष्ठ व्यासंगी समीक्षक-संशोधक- मा. प्राचार्य म. सु. पाटील यांच्या 'सर्जनप्रेरणा आणि कवित्वशोध' या समीक्षात्मक ग्रंथाला साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला ही अतीव समाधान देणारी घटना आहे. संस्कृत साहित्यशास्त्र, पाश्चिमात्य साहित्यविचार, मानसशास्त्र, भारतीय तत्त्वविचार आणि मराठीतील समीक्षाविचार याचा आस्थापूर्वक अभ्यास, सखोल वाचन आणि परंपरेतून आलेले समाजभान यातून वास्तवाची केलेली परखड चिकित्सा ही मा. पाटील यांच्या समीक्षात्मक लेखनाची वैशिष्ट्ये आहेत. त्यांची काव्यसमीक्षा ही सिद्धांतन करणारी आहे. आदिबंधात्मक समीक्षेचे सिद्धांतन करून मराठी समीक्षाक्षेत्रात 'आदिबंधात्मक समीक्षेला' सुप्रतिष्ठित करण्याचे महत्त्वाचे श्रेय आदरणीय पाटील सरांना जाते. नियतकालिक काढण्यास शिष्यांना प्रोत्साहन देऊन 'अनुष्टुभ'सारखे दर्जेदार नियतकालिक निर्माण होण्यास म. सु. पाटील साहाय्यभूत ठरले. म. सु. पाटील यांच्यासारख्या व्यासंगी संशोधकांचा सन्मान झाल्याने पुरस्काराचाच सन्मान झाला आहे. मा. पाटील सरांचे मनःपूर्वक अभिनंदन!

अखिल भारतीय नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदी मा. प्रेमानंद गज्वी यांची निवड झाली. त्याचप्रमाणे या वर्षीचा 'ज्ञानपीठ' पुरस्कार मा. अमिताव घोष यांना मिळाला. याबद्दल या दोन्ही मान्यवरांचे मनःपूर्वक अभिनंदन!

हे वर्ष साहित्यिक पु. ल. देशपांडे आणि ग. दि. माडगूळकर यांचे जन्मशताब्दी वर्ष आणि ना. सी. फडके यांची शतकोत्तर रौप्यजयंती साजरी होत आहे. या निमित्ताने या दिग्गजांनी केलेल्या साहित्यसेवेची स्मृती जागविणे आणि त्यांनी मराठी साहित्यव्यवहारावर टाकलेल्या प्रभावाची चिकित्सा करणे हे आवश्यक आहे. या कारणास्तव परिषदेमार्फत वर्षभर कार्यक्रम होणार आहेत. या तीनही ख्यातकीर्त साहित्यिकांच्या कार्यकर्तृत्वाचा आढावा अंकात घेतला आहे. 'पुलं.'विषयीचा 'मायावादी भाष्यकार आचार्य पुरुषोत्तम' हा तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा 'साहित्य पत्रिके'तील लेख पुनर्मुद्रित केला आहे. यामागे नवीन पिढीतील वाचकांना हा लेख वाचायला मिळावा आणि त्यांच्या जाणिवा समृद्ध व्हाव्यात हा हेतू आहे. 'गदिमां'विषयीचा 'मराठीचा विदग्ध महाकवी गदिमा' हा डॉ. रामचंद्र देखणे यांचा लेख आणि फडक्यांचे 'सुरीले' शब्द हा अंबरीश मिश्र यांचा लेख या दोन्ही साहित्यिकांविषयीची नवी मर्मदृष्टी देणारे आहेत. मनोहर विभांडिक यांच्या 'एका दुएसाठी' या काव्यसंग्रहावरील प्रा. डॉ. शंकर बोऱ्हाडे यांचा लेख आणि बाळासाहेब लबडे यांच्या 'मुंबई...बंबई... बॉम्बे...' या काव्यसंग्रहावरील अंजली कुलकर्णी यांचा लेख या कवींच्या कवितेतील सौंदर्यस्थळे उलगडून दाखविणारे आहेत. डॉ. विश्वनाथ शिंदे यांचा जातिपुराणावरील संशोधनात्मक 'म्हारांचे जातिपुराण' हा लेख आणि डॉ. फुला बागुल यांचा 'विशुद्ध विज्ञानकवितेकडून विज्ञानस्पर्शी कवितेकडे' हा लेख वेगळ्या विषयांवरील असून ते संशोधन आणि चिकित्सेविषयीचे नवे भान देणारे आहेत. डॉ. राहुल पाटील यांचा लहू कानडे यांच्या 'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व' या काव्यसंग्रहाच्या संपादनावरील लेख वंचितांच्या वेदनांचा स्वर मुखर करणारा आणि त्यांच्या काव्याची शक्तिस्थळे उलगडणारा आहे. या अंकातील समीक्षा संमेलनाचे अध्यक्ष मा. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचे भाषण मराठीतील समीक्षा व्यवहाराची चिकित्सा करणारे आहे. डॉ. कोत्तापल्ले यांनी नोंदविलेली निरीक्षणे समीक्षा, समीक्षा सिद्धांतन आणि मराठी समीक्षापद्धती या संदर्भात विचारप्रवर्तक आहेत. हा लेख मराठी समीक्षकांना पथदर्शक ठरणारा आहे.

नुकतेच सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठातील माजी इंग्रजी विभागप्रमुख प्रा. डॉ. अनिकेत जावरे यांचे दिल्ली येथे दुःखद निधन झाले. त्यांच्या निधनाने इंग्रजी-मराठी साहित्य समीक्षा व्यवहाराची आणि समस्त साहित्य संशोधनक्षेत्राची अपरिमित हानी झाली आहे. त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली!

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाईल ॲपवरही उपलब्ध आहे.)












भाषण

डॉ. नागनाथ कोत्तापल्ले

# मराठी साहित्य, समीक्षा आणि वाङ्मयेतिहास



**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा पंढरपूर आणि कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालय, पंढरपूर मराठी विभाग आयोजित 'समीक्षा संमेलना'चे अध्यक्ष मा. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचे अध्यक्षीय भाषण.**



कुठल्याही भाषेमध्ये ललित साहित्याएवढेच त्या भाषेतील समीक्षा लेखनालाही तेवढेच महत्त्व असते. समीक्षा अनेक प्रकारची कार्ये करीत असते. मुख्यत: ती साहित्यकृतींमधील सौंदर्य जसे उलगडून दाखवीत असते, त्याप्रमाणेच ती त्या त्या साहित्यकृतीची महत्ताही सांगत असते. त्या साहित्यकृतीचा रूपबंध, भाषा, आशयद्रव्याचे स्वरूप, लेखकाचे व्यक्तिमत्त्व हे घटक जसे समीक्षेच्या दृष्टीने महत्त्वाचे असतात, त्याप्रमाणेच त्या त्या समाज आणि संस्कृतीशी असणारे तिचे संबंधही महत्त्वाचे असतात. एकंदरीत साहित्यकृतीचा, एकूण साहित्याचा चहुअंगाने शोध घेणे साहित्यसमीक्षेला महत्त्वाचे वाटत असते. त्यासाठी मग समीक्षा विविध पद्धतींचाही आधार घेत असते. उदा. ऐतिहासिक, मार्क्सवादी इत्यादी.

साहित्यसमीक्षा इतकेच करीत असते, असे नाही, तर रसिकांना काही एक दिशा दर्शविण्याचे काम तर ती करतेच, पण एकूण साहित्यजगतापुढील कोणते धोके आहेत, तेही सांगत असते. एका प्रकारे निर्मितीमध्ये नवचैतन्य निर्माण करण्याचेही कार्य करते. कधी कधी निर्मितीच्या क्षेत्रात काही प्रश्न निर्माण होतात. उदाहरणार्थ, श्लील-अश्लीलतेचा प्रश्न अधूनमधून निर्माण होतो. लेखकांच्या आविष्कार - स्वातंत्र्याचा प्रश्न तर सततच ऐरणीवर असतो. अशा तात्कालिक प्रश्नांच्या अनुषंगानेही समीक्षालेखन होते.

उपयोजित समीक्षा असो की तात्कालिक प्रश्नांच्या अनुषंगाने लिहिली गेलेली समीक्षा असो, त्यामागे कुठला तरी सैद्धांतिक व्यूह असतो, काही सैद्धांतिक तत्त्वे असतात. समीक्षक आपण कुठली तत्त्वे वापरत आहोत, अगर कुठला सिद्धांतव्यूह आपल्या लेखनामागे आहे, याचे स्पष्ट प्रतिपादन करीत नसला तरी तो असतोच. त्याचे समीक्षालेखन वाचत असताना ते जाणवत असते.

कधी कधी स्वतंत्र सिद्धांत मांडण्याचाही प्रयत्न काही समीक्षक करीत असतात.

या सगळ्यांचा अर्थ असा की, समीक्षा विविध प्रकारची कार्ये करते. म्हणूनच ती महत्त्वाची असते. एवढेच नाही तर वाचक, लेखक आणि साहित्यव्यवहारातील इतर असंख्य घटकांना 'प्रभावित' करण्याचे सामर्थ्यही समीक्षेत असते. म्हणून तर लेखक समीक्षकांच्या शोधात असतात.

त्या त्या भाषेतील समीक्षालेखनावरून त्या त्या भाषेतील 'साहित्यसंस्कृती' कशी आहे, हेही सांगता येते. त्या त्या समाजाचे एकूण मानवी वर्तन जसे त्या समाजाच्या संस्कृतीमध्ये एकवटून प्रकटत असते, त्याप्रमाणेच समीक्षा आणि





अनुक्रमणिका






एकूण साहित्यव्यवहाराचे प्रकटनही 'साहित्यसंस्कृती'मध्ये होत असते. म्हणजे मुख्यत: साहित्यसमीक्षा कशी आहे, त्यावरून त्या त्या भाषेतील साहित्यसंस्कृती कशी आहे ते कळत असते. म्हणजे ती उदार आहे का, स्वागतशील आहे का, न्यायी आहे का, नवे सिद्धांतन करण्यास सक्षम आहे का, सर्व प्रकारच्या चिकित्सेला सामोरी जाण्याची तिची तयारी आहे का, पुरेशी स्पष्ट आणि धीट आहे का, स्वतंत्र आहे का, तात्कालिक प्रश्नांच्या अनुषंगाने साहित्याच्या स्वरूपाचे चिंतन करू शकते का, निर्भीड मूल्यमापन करू शकते का, हे आणि यासारखे प्रश्न आपण समीक्षेला विचारले, की त्या त्या भाषेतील साहित्यसंस्कृती कशी आहे याचा शोध घेता येतो. म्हणजे या अर्थानेही समीक्षालेखन महत्त्वाचे असते. ('साहित्यसंस्कृती' पाहताना एकूण साहित्यव्यवहारही पाहावे लागतील. परंतु या संदर्भात समीक्षा अधिक महत्त्वाची.)

समीक्षालेखनाचा प्रारंभ आस्वादापासून सुरू होतो. परंतु आस्वाद म्हणजे समीक्षा नव्हे किंवा कलाकृतीची आपल्या मनावर उमटणारी प्रतिक्रिया म्हणजेही समीक्षा नव्हे. समीक्षेमध्ये विविध दृष्टिकोनांचा वापर केला जातो. कुठल्याही दृष्टिकोनाचा वापर केला तरी समीक्षेमध्ये दोन बाबी अतिशय महत्त्वाच्या असतात. एक म्हणजे आपपरभावाच्या पलीकडे जाऊन कलाकृतीचे किंवा एखाद्या सिद्धांताचे 'समदृष्टीने' आकलन करणे. परंतु केवळ आकलन पुरेसे असत नाही. त्या पलीकडे जाऊन चिकित्साही केली पाहिजे. अशी चिकित्सा जर केली नाही तर ती समीक्षा अपूर्ण राहते. म्हणून चांगल्या समीक्षेच्या दोन खुणा असतात. एक समदृष्टी आणि दुसरी खूण म्हणजे चिकित्सा. सर्व दृष्टींनी पारखणे म्हणजे चिकित्सा होय. तत्त्वत: असे सगळे असले तरी समीक्षक हा कुठल्या परग्रहावर राहणारा महामानव असत नाही, तर तोही एका विशिष्ट समाजात राहणारा माणूसच असतो.

विशिष्ट समाज म्हणत असताना त्या समाजाचे स्वरूप पाहावे लागते. भारतीय समाज म्हटला की, जात नावाची गोष्ट अनेक बाजूंनी माणसावर परिणाम करीत असते. धर्म तर असतोच. आता तो अधिकाधिक उग्र होत चालला आहे, त्याचेही परिणाम सर्व जीवनव्यवहारावर प्रत्यक्ष-अप्रत्यक्षरीत्या होतात, हे गृहीत धरले पाहिजे. त्यामुळे सांस्कृतिक क्षेत्रात ते होणारच नाहीत, असे कसे म्हणता येईल?

दुसरी गोष्ट म्हणजे समीक्षक 'माणूस' आहे. म्हणजे त्याला राग लोभ जसे असतील, त्याप्रमाणे त्याचे हितसंबंधही असू शकतात. तसेच त्याची जडणघडण कशी झाली, हाही महत्त्वाचा प्रश्न असतो. या सगळ्या गोष्टींचा परिणाम त्याच्या समीक्षालेखनावर होण्याची शक्यता असते. म्हणजे आकलनावरच होण्याची शक्यता असते.

तेव्हा भारतातल्या समीक्षकांना प्रथमत: जातिधर्माच्या पलीकडे जाण्याची तपश्चर्या करावी लागते. (खरे म्हणजे ही तपश्चर्या १५ ऑगस्टनंतरच्या आणि संविधान स्वीकारानंतरच्या प्रत्येक नागरिकासाठीच आवश्यक आहे. समीक्षक प्रथमत: नागरिक असल्याने त्याच्यासाठी तर ती अधिकच आवश्यक आहे.)

समीक्षक हा 'विशिष्ट समाजात' राहणारा 'माणूस' असतो, हे लक्षात घेतले की समीक्षेतील अनेक उणिवा, समीक्षेच्या प्रभावामुळे निर्माण झालेली परिस्थिती लक्षात येते. विशेषत: एखाद्या लेखकाची अगर पुस्तकाची जेव्हा उपेक्षा होते किंवा एखाद्या पुस्तकाचा किंवा लेखकाचा अधिकच उदोउदो केला जातो, तेव्हा तो समीक्षक कोण आहे, त्याची जडणघडण कशी झाली आहे, कुठली विचारसरणी मानणारा आहे, त्याची वाङ्मयीन दृष्टी कशी आहे, या बाबी शोधाव्या लागतात. कधी कधी एखादा लेखक काही नवे करू इच्छितो, तेव्हा त्याला समजून न घेता किंवा अजाणता काही प्रतिकूल लिहिले जाते, तेव्हा त्या लेखकाचा लेखनाचा उत्साहच मावळून जाण्याची शक्यता असते. या संदर्भात अनेक उदाहरणे देता येतील. परंतु या संदर्भातील प्रसिद्ध उदाहरण म्हणजे एकोणिसाव्या शतकातील प्रसिद्ध कवी महादेव मोरेश्वर कुंटे यांचे देता येईल.

महादेव मोरेश्वर कुंटे यांनी 'राजा शिवाजी' हे आगळेवेगळे काव्य लिहिले. साने गुरुजींप्रमाणेच जनसामान्यांच्या भाषेत लिहिले पाहिजे, अशी त्यांची धारणा होती. मात्र त्या काळात काव्याची एक घडीव भाषा असली पाहिजे, असे मानले जात होते. पांडित्यपूर्ण लिहिले तर अधिकच प्रशंसनीय मानले जात होते. अशा काळात जनसामान्यांच्या भाषेत लिहिले पाहिजे, या जाणिवेने महादेव मोरेश्वर कुंटे यांनी 'राजा शिवाजी' हे काव्य लिहिले. परंतु या काव्यावर इतकी टीका झाली की, शेवटी हे काव्य अर्धवटच राहिले. या काव्याचे पहिले सहा भाग प्रकाशित झाले. पुढचे नियोजित सहा भाग मात्र कुंटे यांनी लिहिलेच नाहीत. याच्या थोडेसे आधी महात्मा फुले लेखन करीत होते. त्यांच्या लेखनाचीही फारशी दखल घेतली गेली नाही. जी दखल घेतली गेली, ती त्यांच्यासाठी अवमानकारक होती. परंतु अशा परिस्थितीही महात्मा फुले



अनुक्रमणिका



'समीक्षा संमेलनात' भाषण करताना अध्यक्ष नागनाथ कोत्तापल्ले.

लिहीत राहिले. कारण समाजपरिवर्तन हे त्यांचे ध्येय होते. परंतु अशी उदाहरणे फार कमी असतात. आजही अनेक लक्षणीय आविष्कार करणारे लेखक प्रतिसादाअभावी मूक होऊन जातात. त्यामुळे समीक्षकांविषयीचा एक धाक निर्मात्यांच्या मनात असतो. अलीकडच्या काळात तो पुष्कळ कमी झाला आहे. (अर्थात ते चांगलेच झाले आहे.) त्याची कारणेही सांगता येतील. तरीही साहित्यव्यवहारावरती सर्वाधिक प्रभाव गाजविणारा घटक म्हणून समीक्षेचा उल्लेख करावा लागतो.

समीक्षेचा विचार करताना सैद्धांतिक समीक्षेचा विचार करणेही गरजेचे असते. परंतु मराठीपुरते बोलायचे तर मराठीमध्ये सैद्धांतिक समीक्षा फार कमी लिहिली गेली आहे. तशीही सैद्धांतिक समीक्षेची वाटचाल अत्यंत संथ गतीने चालू असते. कधी कधी शे-सव्वाशे वर्षांनी काहीतरी नवी सैद्धांतिक मांडणी होण्याची शक्यता असते. मराठी समीक्षेमध्ये तर संस्कृत साहित्यशास्त्राचा स्वीकार करायचा की पाश्चात्त्य साहित्य सिद्धांताचा विचार करायचा, याचा संभ्रम अनेक वर्षे चालू होता. आजही काही प्रमाणात तो चालूच आहे. त्यामुळे सैद्धांतिक मांडणी करणाऱ्या मीमांसकांची संख्या फारशी मोठी नाही. वा. ब. पटवर्धन, बा. सी. मर्ढेकर, शरश्चंद्र मुक्तिबोध, दि. के. बेडेकर, मा. गो. देशमुख ही काही नावे आवर्जून सांगितली पाहिजेत. गेल्या पन्नास वर्षांतील रा. भा. पाटणकर (सौंदर्य मीमांसा), सुधीर रसाळ (कविता आणि प्रतिमा), द. ग. गोडसे (पोत), गो. मा. पवार (विनोदाची औपपत्तिक मीमांसा) आणि हरिश्चंद्र थोरात (कादंबरी) यांनी मराठीतील सैद्धांतिक समीक्षा समृद्ध केली आहे असे म्हणता येईल. यात आणखी दोन-चार नावे वाढू शकतील. पण सैद्धांतिक समीक्षेचे स्वरूप लक्षात घेता ते स्वाभाविकच आहे, असे म्हटले पाहिजे.

उपरोक्त सर्व मीमांसक आणि त्यांनी केलेल्या मीमांसा चिकित्सेला कधीही नकार देत नाहीत. म्हणून बा. सी. मर्ढेकर यांचा लय सिद्धांत नाकारण्याचे स्वातंत्र्य आपणाला असते. तसेच दि. के. बेडेकरांनी केलेल्या रस मीमांसेचा विस्तारही आपणास करता येऊ शकतो. 'मानुषता' हे शरश्चंद्र मुक्तिबोधांनी सांगितलेले मूल्य किती मार्क्सवादी? असा प्रश्न उपस्थित केला जातो. इतर ग्रंथांबद्दलही तेच म्हणता येईल. कारण उपयोजित समीक्षा असो की सैद्धांतिक समीक्षा असो, ती चिकित्सेचा विषय असतेच. श्रेष्ठ दर्जाची सैद्धांतिक समीक्षा नेहमीच चिकित्सेला सामोरे जाणारी असते. कारण चिकित्सेमधून विकास होतो. म्हणून वास्तववाद असो, अतिवास्तववाद असो किंवा वाङ्मयप्रकारांसंबंधी मांडलेला एखादा सिद्धांत असो, त्याची चिकित्सा केली जाते. त्यातून नवे काही हाती येते.

परंतु भुसभुशीत पायावर उभे राहू पाहणारे 'देशीवादा'सारखे सिद्धांत चिकित्सेपासून स्वत:ला दूर ठेवू पाहतात. वेद पवित्र असतात, त्यावर बोलू नका असे एकेकाळी धमकावले जायचे. आज गाय हा प्राणी अनेकांचे प्राण घेतो आहे. तसे देशीवादाचेही आहे. देशीवादाबद्दल लिहिले, बोलले तर लिहिणाऱ्यांवर असांसदीय भाषेत गरळ ओकणे, हेतूंबद्दल शंका घेणे, देशीवादाच्या प्रतिपादकांना दैवी रूप देणे असे प्रकार भोवती होत आहेत. भक्ती आणि भक्त यांना अध्यात्माच्या क्षेत्रात महत्त्व असू शकेल. परंतु साहित्याच्या, संस्कृतीच्या क्षेत्रात भक्तीला आणि भक्तांना कवडीचेही मोल असत नाही. तुम्ही चिकित्सेला सामोरे जायला नाही म्हणत असाल तर तुमचे सिद्धांतनच भुसभुशीत पायावर उभे आहे, खोटे आहे, हे आपोआपच सिद्ध होते. देशीवाद साहित्याच्याच काय समाजाच्या गतीला अवरुद्ध करणारा आहे, समाजाला मध्ययुगामध्ये नेणारा आहे, हे पुन्हा सांगण्याचीही गरज नाही. देशीवादाच्या 'ट्रोल्स'नी ते सिद्धच केले आहे!



अनुक्रमणिका

एकंदरीत काय, की चिकित्सा ही महत्त्वाची गोष्ट आहे. सिद्धांतांची, तत्त्वांची चिकित्सा होणे कुठल्याही साहित्याच्या 'सांस्कृतिक' विकासाची खूण असते.

सैद्धांतिक समीक्षेपेक्षा उपयोजित समीक्षेचा प्रांत खूप मोठा असतो. सैद्धांतिक समीक्षेमध्ये विवेचनाच्या दरम्यान कोणत्या साहित्यकृतींचा निर्देश केला जातो, (तो का केला जातो) याचा समावेश उपयोजनाच्या संदर्भातच करावा लागतो. परंतु त्या पलीकडे जाऊन विविध दृष्टिकोनातून केलेले वाङ्मयाचे आकलन, प्रवाहांचे आकलन, कलाकृतींचे आकलन, वाङ्मयप्रकारांचे आकलन या साऱ्यांचाच निर्देश उपयोजित समीक्षेत केला जातो. लेखकांच्या व्यक्तिमत्त्वांसंबंधी केलेले लेखन, प्रवृत्तींविषयक केले गेलेले लेखन, परीक्षणे, वाङ्मयाकलनाला उपयोगी होईल असे केले गेलेले संशोधन, मूल्यांकन, पुनर्मूल्यांकन, पुस्तकांना लिहिलेल्या प्रस्तावना, लेखकांचे मनोगत, पुस्तकाच्या मलपृष्ठांवरील मजकूर, पत्रव्यवहार - मग तो वाङ्मयीन असेल अगर खाजगी असेल, त्यातून व्यक्त झालेली मतमतांतरे असा केवढा तरी मोठा व्याप उपयोजित समीक्षेचा असतो. वाङ्मयेतिहासाचा समावेशही उपयोजित समीक्षेत येऊ शकेल. या सगळ्यांचा सविस्तर परामर्श येथे घेता येणार नाही. परंतु मराठी समीक्षेतील काही प्रवृत्तींचा मात्र येथे निर्देश करता येऊ शकेल.

त्यातील एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मराठी समीक्षा ही अतिशय गतानुगतिक आहे. पुष्कळदा तीच ती मते, त्याच त्या भाषेत शंभर शंभर वर्षे मांडली जातात. केशवसुतांचे मोठेपण मान्य करूनसुद्धा त्यांनी फुंकलेली तुतारी अजूनही आमच्या समीक्षेत फुंकली जाते, असे म्हणता येईल. पण कुणीही असे म्हणत नाही की, ज्या आधुनिक मूल्यांचा पुरस्कार केशवसुतांनी केला, त्याच मूल्यांचा स्वीकार म. फुले यांनीही त्यांच्या अखंडांमधून केला होता. मग महात्मा फुले यांच्या कवितेचे मोल काय, त्याचे स्थान काय, असा विचार मराठी समीक्षेला करावासा वाटत नाही. स्वप्नरंजनामध्ये गळाभर बुडालेली रविकिरण मंडळाची कविता मराठी कवितेचा विकास करणारी होती, असे जेव्हा सांगितले जाते, तेव्हा जीवनातील वास्तवाचा, मूल्यांच्या अनुषंगाने शोध घेणारी विपुल 'सत्यशोधकी' कविता लिहिली जात होती, याचा निर्देश करावा, असेही मराठी समीक्षेला वाटत नाही. फडके-खांडेकरांच्या काळात मुकुंदराव पाटील, वि. वा. हडप इत्यादी लेखक कादंबरीलेखन करीत होते, हे मराठी समीक्षेच्या गावीही नसते.

याच प्रवृत्तीचे आणखी एक उदाहरण म्हणजे साठोत्तरी साहित्य ही संज्ञा. १९६० साली महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली म्हणून साठोत्तरी साहित्य का? की जगभरच्या साहित्यात १९६० नंतर बदल झाले म्हणून साठोत्तरी साहित्य? मराठी साठोत्तरी साहित्याचा आणि मर्ढेकर-मुक्तिबोध यांच्या पिढीने घडविलेल्या परिवर्तनाचा काहीच संबंध नाही का? मर्ढेकर-मुक्तिबोध यांच्या पिढीने मराठी साहित्यात जे परिवर्तन घडविले, त्याचा विस्तार म्हणजे साठोत्तरी साहित्य नाही का? असे प्रश्न मराठी समीक्षेला कधीच पडत नाहीत. कुणीतरी म्हणणार की १९६०नंतर मराठी साहित्यात परिवर्तन झाले, की तेच पुन्हा पुन्हा म्हटले जाणार!

खरे म्हणजे साहित्यात परिवर्तन होते तेव्हा एक मूलगामी परिवर्तन समाजात होणे गरजेचे असते. स्वातंत्र्याच्या आसपास जन्मलेली पिढी साधारणत: १९७५च्या आसपास लिहू लागली. हा भारतीय इतिहासातला भ्रमनिरासाचा कालखंड होता. (म्हणून १९७५नंतर विविध आंदोलनेही झाली.) स्वातंत्र्य मिळाले, नवी राज्यघटना आली, पण भोवती स्वातंत्र्य, समता आणि बंधुता फारशी दिसत नाही, हे या पिढीचे दु:ख होते. त्यातून साहित्याच्या क्षेत्रात नव्या वाङ्मयीन चळवळी आल्या. दलित आणि ग्रामीण साहित्याच्या पाठोपाठ स्त्रीवादी आणि आदिवासी चळवळींचा उदय झाला. जीवनासंबंधीचे आणि साहित्यासंबंधीचे नवे भान मराठी साहित्याला आले. मराठी साहित्यातील खरे परिवर्तन या चळवळींमुळे आणि येथून पुढे झाले. या मूलगामी परीवर्तनाचा विचार न करता या चळवळींचा सुटासुटा विचार करून मराठी समीक्षा वेळ भागवून नेते.

गतानुगतिकतेच्या संदर्भातील एक गमतीचे (खरे म्हणजे गंभीर) उदाहरण येथे द्यायला हरकत नाही. इंदुमती शेवडे यांनी मराठी कथेवर एक अभ्यासपूर्ण प्रबंध लिहिला आहे. त्यात एका ठिकाणी कोकणातील महत्त्वाच्या कथाकारांच्या कथेचे विवेचन केले आहे. त्यानंतर त्यांनी कोकणातील कथाकार म्हणून एक यादी दिली आहे. त्यामध्ये मराठवाड्यातील सुप्रसिद्ध कथाकार बी. रघुनाथ यांचाही उल्लेख केला आहे. (पहिली आवृत्ती) या संदर्भात त्यांना कळविल्यानंतर त्यांनी पुढच्या आवृत्तीमध्ये बदल केला. बदल कोणता तर बी. रघुनाथांचे नाव कोकणातील लेखकांच्या यादीतून काढून मराठवाड्यातील लेखकांच्या यादीत टाकले. म्हणजे बी. रघुनाथांनी काय लिहिले, त्यांचे

किती कथासंग्रह आहेत, हे वाचण्याची तसदीही त्यांनी घेतली नाही. कथा या वाङ्मयप्रकारावर जेव्हा प्रबंध लिहिला जातो, तेव्हा सर्व कथाकार वाचणे गरजेचे असते. परंतु वाचण्याची तसदी अनेक समीक्षक घेत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे.

इंदुमती शेवडे यांनी बी. रघुनाथांना कोकणातील लेखकांच्या यादीत का टाकले, याचा शोध घेताना असे लक्षात आले की 'प्रदक्षिणा' या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीत म. ना. अदवंत यांनी तसा निर्देश केला आहे. म्हणजे म. ना. अदवंत हेच प्रमाण मानून इंदुमतीबाईंनी आपल्या ग्रंथात तसा उल्लेख केला.

याचा अर्थ असा की, एखाद्या समीक्षकाने एखादे विधान केले की पुढची शे-पन्नास वर्षं त्यात बदल होत नाही. ते विधान चूक की बरोबर, हे न पाहताच पुढे सांगितले जाते. ते तपासून पाहणे, त्यात भर घालणे, नवे मूल्यमापन करणे, नवा अन्वयार्थ लावणे, समकालीन जीवनाच्या संदर्भात ताडून पाहणे, अशा अनेक बाबी समीक्षकांकडून अपेक्षित असतात. ते मात्र मराठी समीक्षेत क्वचितच होते. विशेषत: मराठी साहित्याच्या अध्यापनात शक्यतो बदल होत नाही. मग पुढची पिढीही तेच सांगत राहते. लिहीत राहते.

एकंदरीत काय की, मराठी समीक्षा गतानुगतिक राहण्यात धन्यता मानते. हे काही चांगल्या समीक्षेचे लक्षण मात्र नाही. तसेच मराठी समीक्षेला काही चमत्कारिक खोडी आहेत. विशेषणे लावण्याची हौस हीही एक खोड. 'थोरली पाती', 'धाकटी पाती', 'मधली फळी', 'पहिली पिढी', 'दुसरी पिढी', 'तिसरी पिढी', अशी विशेषणे लावली जातात. अशा वेळी दोन पिढ्यांमध्ये लिहिणारे अलगद सुटून जाण्याची शक्यता असते. या पुढे जाऊन '...प्रणेते', 'अर्धशतकाचे कादंबरीकार', 'दशकातील कथाकार', 'दशकातील कवी' अशीही विशेषणे लावली जातात. अशा विशेषणांमुळे कसा गोंधळ होतो, चांगल्या साहित्यापासून वाचक दूर जाण्याची कशी शक्यता असते, परिणामी साहित्यजगताचे कसे नुकसान होते, यासंबंधीचे विवेचन तौलनिक साहित्याचे अभ्यासक डॉ. निशिकांत मिरजकर यांनी केले आहे. समीक्षेमध्ये कधी कधी लेखकांसाठी उनोक्तीचा वापर होतो, तर कधी कधी अत्युक्तीचा वापर केला जातो असे सांगून ते म्हणतात-

''उनोक्तीप्रमाणेच अत्युक्तींची कहाणी. मराठी कादंबरीच्या व काव्याच्या क्षेत्रात विशिष्ट साहित्यिकांच्या नावाने दहा-दहा, पंधरा-पंधरा वर्षांची 'युगे' निर्माण करण्याच्या प्रवृत्तीला आपण मागेच हास्यास्पद ठरविले होते. पण या उत्साही प्रवृत्तीची आठवण यावी, असे प्रकार आपण मधूनमधून करतच असतो. एका चर्चासत्रात 'अर्धशतकाचा कादंबरीकार' असा एका कादंबरीचा (कादंबरीकाराचा?) गौरव करण्यात आला आणि त्या कादंबरीकाराच्या उपस्थितीत त्याच्या श्रेष्ठत्वाचे गोडवे गाण्याची अहमहमिका त्यांच्या भक्तगणात लागली असल्याचे हास्यास्पद दृश्य पाहण्यात आले. केतकर, विभावरी शिरूरकर, साने गुरुजी, विश्राम बेडेकर, श्री. ना. पेंडसे, भालचंद्र नेमाडे, चिं.त्र्यं. खानोलकर, रंगनाथ पठारे, अरुण साधू, विश्वास पाटील यांच्यासारख्या विविध कादंबरीकारांच्या योगदानाने मराठी कादंबरीचा विकास झालेला आहे. त्यातल्या कुणा एकाला 'अर्धशतकाचा कादंबरीकार' मानणे म्हणजे वाङ्मयप्रकाराच्या घडणीचे अज्ञान व्यक्त करण्यासारखे आहे. भारतीय स्तरावर रवींद्रनाथ, शरश्चंद्र आणि जागतिक स्तरावर इंग्लिश, फ्रेंच, रशियन, आफ्रिकन इत्यादी भाषांतील कादंबरीकाराच्या तुलनेत विचार केल्यावर 'अर्धशतकाचा कादंबरीकार' हे मूल्यमापन अगदीच केविलवाणे वाटू लागते.''

(तौलनिक साहित्य, पृ. २८-२९ - प्रतिमा प्रकाशन, पुणे २०१६)

अशी विशेषणे खरे तर मूल्यमापनात्मक मानली जाऊ नयेत, परंतु ग्रंथव्यवहारावर त्यांचा परिणाम होतोच. हे एवढ्यावरच थांबत नाही तर पुढेही चालत राहते. 'अर्धशतकाचा कादंबरीकार' हा हास्यास्पद प्रकार असला तरी या शीर्षकाचे दोन तीन लेख येऊन गेलेच! अर्थात अशी



**साहित्याचे क्षेत्र हे निर्मितीचे क्षेत्र असते. सतत तेथे काही ना काही निर्माण होत असते. त्या सगळ्यांकडे सम्यक दृष्टीने समीक्षेने पाहण्याची अपेक्षा असते. परंतु असे घडताना दिसत नाही. लोकसाहित्य, कामगार रंगभूमी, लोकरंगभूमी या गोष्टी चर्चेच्या परिघाबाहेरच राहतात. रंगभूमी म्हटली की, पुण्यामुंबईला जे घडते तेवढेच, अशी नाट्य समीक्षकांची धारणा असते. हे लोकसाहित्य, लोकरंगभूमी इत्यादीसंबंधीच घडते असे नाही. तर साहित्यक्षेत्रात घडणाऱ्या विविध आविष्कारांची दखलही समीक्षकांना घ्यावीशी वाटत नाही. ते एखादा खुंटा ठरवितात आणि त्या भोवती फिरत राहतात.**

विशेषणे लावताना काही 'धोरणात्मक' व्यूहरचना असू शकते, असते, असे म्हणता येते. ते काहीही असो, पण समीक्षेमध्ये असे प्रकार घडत राहणे, हे साहित्यव्यवहाराला काही भूषणावह नाही.

मराठी समीक्षक जसे विशेषणांच्या प्रेमात पडतात, तसेच आकड्यांच्याही प्रेमात पडलेले दिसतात. हिंदू मनामध्ये पाच या आकड्याला एक विशेष स्थान असल्यामुळे की काय, ते सतत पाचाच्या भाषेत बोलतात. उदाहरणार्थ, 'पाच संत कवी', 'पाच चिंतनिका', 'पाच कथाकार', 'पाच आधुनिक कवी' इत्यादी. आपण अधिक समावेशक आहोत, हे दर्शविण्यासाठी मराठीमध्ये 'सहा कथाकार' हे संपादनही प्रकाशित झालेले आहे. आता सहाच का? तर कोणाच्या तरी समावेशासाठी. आणि पाचच का, तर त्याच काळातील अनेकांना वगळण्यासाठी. अशा निवडीतून किंवा समावेशनातून वाचकांना, रसिकांना प्रभावित करण्याचा प्रयत्न समीक्षक करीत नाहीत, असे काही म्हणता येणार नाही.

साहित्याचे क्षेत्र हे निर्मितीचे क्षेत्र असते. सतत तेथे काही ना काही निर्माण होत असते. त्या सगळ्यांकडे सम्यक दृष्टीने समीक्षेने पाहण्याची अपेक्षा असते. परंतु असे घडताना दिसत नाही. लोकसाहित्य, कामगार रंगभूमी, लोकरंगभूमी या गोष्टी चर्चेच्या परिघाबाहेरच राहतात. रंगभूमी म्हटली की, पुण्यामुंबईला जे घडते तेवढेच, अशी नाट्य समीक्षकांची धारणा असते. हे लोकसाहित्य, लोकरंगभूमी इत्यादीसंबंधीच घडते असे नाही. तर साहित्यक्षेत्रात घडणाऱ्या विविध आविष्कारांची दखलही समीक्षकांना घ्यावीशी वाटत नाही. ते एखादा खुंटा ठरवितात आणि त्या भोवती फिरत राहतात. या संदर्भात 'हंस'चे संपादक आनंद अंतरकर म्हणतात,

''कोणी काहीही म्हणो! मला ठामपणे वाटतं, की मराठी साहित्य एका दृष्टीनं दरिद्रीच. विविधतेनं नटलेल्या जगभरच्या साहित्याकडे दृष्टिक्षेप टाकला की हे दारिद्र्य अधिकच गडद होतं. इथले समीक्षक! त्यांच्या विषयी बोलायलाच नको! (अपवाद तीन : वा. ल. कुलकर्णी, गो. मा. पवार आणि धों. वि. देशपांडे) जी थोडीफार विविधता इथं नांदली - नांदत आहे, त्याविषयी यांनी सदैव आळीमिळी गुप चिळी पाळली. त्या साहित्याकडे पद्धतशीरपणे पाठ वळवली किंवा आपलं अज्ञान झाकण्यासाठी चक्क कानाडोळा केला. मराठी साहित्याच्या कक्षा संकुचित करण्याचा घोर गुन्हा या लोकांच्या हातून घडला. मराठी कथेचं अतोनात नुकसान झालं. वर्षानुवर्षं ती विशिष्ट रिंगणात फिरत राहिली. 'तो-ती'च्या बंदिस्त भावजीवनातल्या नियमित कक्षेतच तिच्या फेऱ्या घडत राहिल्या. पुष्कळशा सत्पात्र आणि गुणवान लेखकांच्या लेखनाचं इथं ठरवून खच्चीकरण करण्यात आलं. त्यांना डावलण्यात अलं. त्या लेखकांपाशी प्रसिद्धीचं तंत्र नव्हतं. त्यांच्याभोवती भाटांचं कडं नव्हतं. ते कुठल्या कंपूत किंवा गटात नव्हते. उदो उदो करणारे किंवा 'अहो रूपम् अहो ध्वनि:' छापाचे मित्र त्यांच्याजवळ नव्हते. पण एक गोष्ट त्यांनी साध्य केलेली होती. सर्व स्तरातल्या चोखंदळ वाचकांमधली प्रियता आणि या महत्तम गुणामुळेच त्यांच्या हातून दीर्घकाळ वैविध्यसंपन्न व सकस लेखन होत राहिलं. कशाचाही आणि कुणाचाही मुलाहिजा न ठेवता ते आत्मविश्वासानं आपली वाटचाल करीत राहिले. आणि लक्षात घेण्याजोगी एक मोठी गोष्ट म्हणजे, केवळ लोकप्रियतेच्या भुलभुलैयात अडकलेले हे लेखक नव्हते. त्यांचं नाणंच मुळात अस्सल होतं. आणि ते अस्सल होतं म्हणूनच खणखणीत वाजत राहिलं.''

**(अंतरकर आनंद, 'सेपिया', मोझेक, पृ. १७२-७४, हंस प्रकाशन, पुणे, २०१७.)**

मराठी साहित्यसंस्कृतीबद्दल आनंद अंतरकर यांनी केलेले हे विवेचन आपल्याला नवे भान देणारे आहे. आनंद अंतरकर हे समीक्षक नाहीत. परंतु 'हंस'सारखे नियतकालिक चालविण्याचा त्यांचा अनेक वर्षांचा अनुभव आहे. ते जाणते वाचक-संपादक आहेत. त्यांचे वडील अनंत अंतरकरांच्या तालमीत तयार झालेले आहेत, म्हणून मराठी समीक्षक कसे असंख्य गोष्टींकडे दुर्लक्ष करतात, ते ते स्वानुभवानेच सांगत आहेत.

कधीकधी मराठी समीक्षकांना अचानकच एखादा खुंटा सापडतो. विश्राम बेडेकर यांची 'रणांगण' ही कादंबरी १९३९मध्ये प्रकाशित झाली. परंतु पहिली दहा-बारा वर्षे तिच्या प्रती विकल्याच गेल्या नाहीत. म्हणजे ती दुर्लक्षित राहिली. परंतु गंगाधर गाडगीळांनी 'रणांगण'चा समावेश मानदंडामध्ये केला आणि मराठी समीक्षकांना एक नवाच साक्षात्कार झाला. मग काय 'पहिल्यांदा रणांगण', 'दुसऱ्यांदा रणांगण' असे सुरू झाले. मर्ढेकरांजवळही मराठी समीक्षा जरा अधिकच घोटाळत राहिली असे वाटते.

कधी कधी एखाद्या लेखकाला हेतुत: उपेक्षित ठेवले जाते. परंतु त्याच्यावर ससंदर्भ असा एखादा ग्रंथ लिहिला जातो तेव्हा मात्र त्याच्यावर जणू आपणच प्रथमत: लिहीत आहोत, अशा थाटात काही लेखक पुढे येतात. उदा. गेल ऑमवेट या अमेरिकन विदुषीने महात्मा फुले यांच्यावर



अनुक्रमणिका



'Colonial Revolt in Western Maharastra' हा ग्रंथ लिहिला आणि महाराष्ट्रातील विद्वानांना महात्मा फुले हे लोकोत्तर पुरुष होते, याचा साक्षात्कार झाला! पुन्हा अमेरिकन अभ्यासकाने सांगितले की, आपल्याला जरा लवकर पटते की काय? काहीही असो, शतकभर महात्मा फुले यांच्यावर जो उपेक्षेचा पडदा होता, तो हळूहळू दूर होऊ लागला.

एकंदरीत काय, साहित्यकृतीबद्दल, लेखकाबद्दल लिहिले जाणे महत्त्वाचे असते. त्याबाबतच मराठी समीक्षक कद्रू आहेत की काय असे वाटायला लागते किंवा ते जेव्हा लिहितील तेव्हा निरपेक्ष हेतूनीच लिहितील असे नाही.

कधी कधी साहित्यासंबंधी मांडलेल्या भूमिकाही संशयास्पद असतात. कुठल्या काळात कुठली विधाने केली जातात, हेही नीट पाहिले पाहिजे. साधारणत: १९६०-६५ पर्यंत मराठीतील मध्यवर्ती साहित्यप्रकार कथा हाच होता. ती मोठ्या प्रमाणात लिहिली जात होती. नवकथा म्हणून ती ओळखली जात होती. परंतु मराठी कथालेखनामध्ये आवर्त निर्माण झाले आहे, असा इशारा सुप्रसिद्ध समीक्षक वा. ल. कुलकर्णी यांनी दिला होता.

परंतु पुढे हे आवर्त फोडण्याचे समर्थ प्रयत्न करणाऱ्यांमध्ये जी. ए. कुलकर्णी, बाबुराव बागूल, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, विलास सारंग, आनंद विनायक जातेगावकर यांच्यासारख्या लेखकांचा उल्लेख करावा लागतो. त्यामुळे पुन्हा एकदा मराठी कथा बहू अंगांनी समृद्ध होऊन प्रकटू लागली आणि तशा वेळेस 'कथा हा क्षुद्र वाङ्मयप्रकार आहे' अशी अडाणी आरोळी टाकली गेली. त्याचे प्रतिध्वनी उमटत गेले आणि मराठी कथेची चर्चा होणेच जवळजवळ थांबले. बाबुराव बागूल यांच्यासारख्या द्रष्ट्या लेखकाकडेही दुर्लक्ष होत गेले.

वस्तुत: जगभर कथा लिहिली जाते. निव्वळ कथा लिहून जगप्रसिद्ध झालेले लेखकही जगात आहेत. शिवाय कथा हा प्राचीन आणि मूळ लेखनप्रकार आहे तसेच कुठलाही वाङ्मयप्रकार श्रेष्ठ अगर कनिष्ठ असत नाही. लेखन - मग कुठल्याही वाङ्मयप्रकारातील असेल - चांगले किंवा वाईट असते. हे ते अडाणी विधान करणाऱ्या लेखकाला माहीत नाही काय? पण हेतू साहित्यचर्चेचा रोख कादंबरीकडे - स्वत:कडे वळविणे हाच होता. तो हेतू निश्चितच सफल झाला. परंतु त्यामुळे बाबुराव बागुलांसारखे अनेक लेखक उपेक्षेच्या अंधारात लोटले गेले आणि मराठी समीक्षा गतानुगतिक असल्यामुळे हे विधान पुढील काही वर्षेतरी पुन्हा पुन्हा सांगितले जाईल.

म्हणजे लेखकाचे अंतर्गत राजकारणही कधी कधी काहींच्या उपेक्षेला कारण ठरते! असे प्रकार ज्या भाषेत घडतात, तेथील 'साहित्यसंस्कृती' निकोप कशी राहील?

समीक्षेतील डावपेच एकूण साहित्यसंस्कृतीलाच कसा हिणकस दर्जा प्राप्त करून देतात, त्याची काही उदाहरणे वर निर्देशिलेली आहेत. या शिवायही साहित्यसमीक्षेतील काही अपप्रकार पुढीलप्रमाणे सांगता येतील.

एखादा कलावंत जसा उत्स्फूर्तपणे एखाद्या कलाकृतीची निर्मिती करतो, तेवढ्याच उत्स्फूर्तपणे समीक्षकाचाही कलाकृतीला प्रतिसाद मिळावयास पाहिजे व त्या प्रक्रियेतून जी समीक्षा लिहिली जाईल, ती त्या कलाकृतीला अधिक न्याय देणारी ठरेल. परंतु तसे आपल्याकडे होत नाही. प्रामुख्याने प्रकाशकाने सांगितल्यावरून अगर एखाद्या संपादकाने सांगितल्यावरून समीक्षा लिहिली जाते. पुष्कळदा तर प्रकाशकांच्या गाठीला अनेक मान्यवर समीक्षक असतात. अशा वेळी जी समीक्षा लिहिली जाते, ती 'प्रकाशकशरण' समीक्षा असते. कधी कधी 'लेखकशरण' समीक्षाही असते. अशा समीक्षेमध्ये पुष्कळसा वकिली बाणा असतो. वकिली बाणा म्हणजे वकील ज्याप्रमाणे आपल्या अशिलाची बाजू मांडतो, त्याप्रमाणे समीक्षक/अभ्यासक लेखकाची बाजू मांडत असतात. विशेषत: संशोधनाच्या नावाखाली जे प्रबंध लिहिले जातात (व पुढे पुस्तकरूपानेही प्रकाशित होतात) त्यामध्ये असे प्रकार अधिक आहेत, असे लक्षात येते. संशोधक/समीक्षक हे विसरून जातो की आपण अभ्यासक आहोत. आपल्या भूमिकेचे एकदा विस्मरण झाले की मग वकिली डावपेच सुरू होतात. परंतु अंतिमत: हे वकिली डावपेच चिकित्सेपासून अभ्यासकाला दूर घेऊन जातात. कुणीतरी सांगितले म्हणून लिहिलेल्या समीक्षेमध्ये काही अपवादात्मक चांगल्या समीक्षाही असू शकतात. त्या ठिकाणी समीक्षक सर्व दबाव झुगारून लिहीत असतो. म्हणूनच ती चांगली समीक्षा होऊ शकते.

पुष्कळशी समीक्षा केवळ कथानके सांगणारी अगर आशय सांगणारी असते. तसेच अवतरणे देणे म्हणजे विद्वत्ता हा समज झाल्यामुळे समीक्षकाचे/अभ्यासकाचे काही स्वतंत्र म्हणणे व्यक्त होतच नाही. एकंदरीत फार थोडी समीक्षा ही समीक्षा या पदाला पोहोचते असे नाइलाजाने म्हणावे लागते.

चांगली समीक्षा त्या त्या भाषेतील साहित्याचे अंतरंग उलगडून दाखविण्याचे, तसेच रसिकांना, अभ्यासकांना कलाकृतींकडे, साहित्याकडे जाण्याचा मार्गही दाखवीत






असते. फक्त ती हितसंबंधांच्या पलीकडे गेली पाहिजे. ती जेव्हा हितसंबंधांच्या वर्तुळात फिरत असते, तेव्हा ती वाङ्मयाचा मुखवटा धारण करून वाङ्मयबाह्य हेतू साध्य करते. परिणामत: साहित्यसंस्कृतीची घसरण सुरू होते.

याचा अर्थ मराठीमध्ये कलाकृतीचे अंतरंग उलगडून दाखवून तिची सामर्थ्यस्थाने प्रकट करणारी, कलाकृतीचा किंवा प्रवाहांचा नवा अन्वयार्थ लावू पाहणारी समीक्षा लिहिली जातच नाही असे मात्र नाही. अशा समीक्षेची एक क्षीण का होईना, परंपरा मराठीमध्ये आहे असे म्हणता येईल. अगदी प्रारंभापासून अशी समीक्षा लिहिली जाते. का. बा. मराठे यांचा तत्कालीन कादंबरी आणि नाटक यांचे विश्लेषण करणारा निबंध याचे उत्तम उदाहरण आहे. पुढेसुद्धा अनेक समीक्षकांनी कलाकृतीकडे सर्वांगाने कसे पाहावे याचा वस्तुपाठ असणाऱ्या समीक्षा लिहिलेल्या आहेत. वा. ल. कुलकर्णी, गंगाधर गाडगीळ, माधव अचवल, स. शि. भावे, सुधीर रसाळ, वसंत पाटणकर, हरिश्चंद्र थोरात, द. ता. भोसले, वासुदेव मुलाटे, डॉ. जे. एम. वाघमारे, स. रा. गाडगीळ, नरहर कुरुंदकर अशी काही सहज आठवलेली नावे. यात भर निश्चितच घालता येईल. नव्या पिढीतील रणधीर शिंदे, रमेश शिंदे, नंदकुमार मोरे, दत्ता घोलप, विद्यासागर पाटंगणकर, नितीन रिंढे या नावांचाही आवर्जून उल्लेख करता येईल. परंतु अशी समीक्षा नेहमीच कमी असते. त्या तुलनेत वर्तमानपत्री, परिचयपर, वकिली बाण्याची, कुणाला तरी शरण गेलेली, टोळीची बांधिलकी जाहीर करणारी अशा समीक्षेचे प्रमाण अधिक आहे. त्यामुळे त्याचा प्रभावही अधिक आहे, असेही जाणवते. त्यातूनच गतानुगतिकता आणि इतर दोष निर्माण होतात आणि ते पुढे चालत राहतात.

॥२॥

वेळच्या वेळी नव्या पुस्तकांची दखल घेतली जाणे हीही चांगल्या समीक्षेची खूण असते. त्या दृष्टीने मराठी समीक्षा अजिबात सजग नाही. एखादे पुस्तक, चांगले पुस्तक प्रकाशित होऊन दहा दहा वर्षे उलटून जातात, पण त्यावर दोन ओळी लिहून आलेल्या आहेत असे दिसत नाही. मग कुणाला तरी कधीतरी ते पुस्तक कुठल्या तरी अर्थाने महत्त्वाचे वाटते आणि त्यावर काहीतरी लिहिले जाते. लिहिणारा मान्यताप्राप्त समीक्षक असेल तर त्याचे म्हणणे पुढील पाचपंचवीस वर्षे मग उद्धृत होत राहते. मराठी समीक्षेच्या या मंद गतीमुळे काही अपप्रकारही घडतात. म्हणजे खुद्द लेखकानेच आपल्या पुस्तकावर समीक्षा लिहावयाची आणि ती टोपणनावाने प्रकाशित करावयाची किंवा कुणा मित्राच्या नावे प्रकाशित करायची, परस्परांनी परस्परांच्या पुस्तकांवर ठरवून लिहायचे, केवळ गौरवपूर्णच लिहायचे, एखाद्या पुस्तकाबद्दल म्हणजे टोळीबाहेरच्या लेखकाबद्दल वाईट लिहायचे असेल तर निनावी किंवा टोपणनावाने लिहायचे असे प्रकार घडताना दिसतात.

परीक्षणे लिहिणारे बहुसंख्य प्राध्यापक असतात. ते साहित्याच्या प्रेमापोटी जसे लिहितात, तसेच व्यवसायाची गरज म्हणूनही लिहितात. ही गरज दिवसेंदिवस वाढत आहे. त्यासाठी मान्यता घेऊन नियतकालिकेही निर्माण होत आहेत. यातील सगळेच लेखन वाईट असते, असे येथे म्हणायचे नाही. परंतु बरेच एकसुरी, जुनीच मते सांगणारे असे असते. तेव्हा असे सुचवावेसे वाटते की, जीवनाच्या इतर क्षेत्रात काम करणारे जे वाचक असतात, त्यांच्याकडून समीक्षा लिहून घेतली पाहिजे. त्या दृष्टीने प्रयत्न झाले पाहिजेत.

पुस्तक नवे असो की जुने असो, त्याच्याकडे वाचक वळतो ते जीवन समजून घेण्यासाठी. समीक्षकही प्रगल्भ असा वाचकच असतो. पण त्याबरोबरच त्याच्याकडे काही व्यासंग असतो, तुलनात्मक दृष्टी असते आणि विशेष म्हणजे त्याच्याकडे काही मूल्यदृष्टी असते. असू शकते. पण महत्त्वाची असते, ती जीवन समजून घेण्याची अपार ओढ आणि उत्सुकता. अशी नवे जाणून घेण्याची, जीवन समजून घेण्याची उत्सुक दृष्टी सध्या कमी पडते आहे का? ज्या प्रमाणात आज नवी नवी पुस्तके प्रकाशित होत आहेत, त्या प्रमाणात आज मराठीत समीक्षक नाहीत का? हे आणि यासारखे असंख्य प्रश्न आज निर्माण होत आहेत.

याच संदर्भात आणखी एक दोन बाबींचा निर्देश करणे आवश्यक वाटते. त्यातील एक म्हणजे अनुपलब्धता. मध्ययुगीन साहित्याच्या संदर्भात अनुपलब्धतेचा प्रश्न असतो. कारण पोथ्या कोठे कोठे विखुरलेल्या असतात. त्या मिळविणे हाच एक प्रश्न असतो. आधुनिक विशेषत: आजच्या वाङ्मयाच्या संदर्भातही हा प्रश्न आहेच असे लक्षात येते. कारण आज महाराष्ट्राच्या दूरदूरच्या भागातून लेखक लिहीत आहेत. तसेच त्या त्या भागातही प्रकाशक निर्माण झाले आहेत. त्यामुळे एका भागात प्रकाशित झालेली पुस्तके दुसऱ्या भागात जातातच असे नाही. किंवा गेलीच तर खूप उशिरा जातात. या संदर्भात काही तरी यंत्रणा निर्माण करण्याची गरज आहे, हे मात्र खरे आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे एखाद्या लेखकाची एक विशिष्ट अशी प्रतिमा निर्माण झालेली असते. म्हणजे विचारवंत,

नाटककार इत्यादी. अशा लेखकाने इतर वाङ्मयप्रकारातून लेखन केले तर त्या लेखनाकडे दुर्लक्ष होण्याची शक्यता निदान मराठीत तरी अधिकच आहे. किंवा कधी कधी एखादा लेखक काळाच्या पुढचे काही सांगू इच्छितो, तेव्हाही त्याच्याकडेही दुर्लक्ष होण्याची शक्यता असते. समाजमान्य संकल्पनांना धक्के देऊ पाहणाऱ्या एखाद्या लेखकाकडेही समीक्षकांकडून दुर्लक्ष होण्याची शक्यता असते. वस्तुत: अशा लेखक-कवींबरोवर झोंबी घेण्यातूनच समीक्षा समृद्ध होत असते. अशा ठिकाणी समीक्षकांना मूल्यात्मक पातळीवर संघर्ष करावा लागतो. मानसिक पातळीवरील दुरावा दूर करून, त्याने तो केला पाहिजे.

एकंदरीत मराठीतील समीक्षाव्यवहार समाधानकारक तर नाहीच, पण तो चिंताजनक आहे, असे म्हणावे लागते.

**२. वाङ्मयेतिहासासंबंधी थोडेसे**

समकालीन साहित्यातील विविध आविष्कारांची दखल घेणे आणखी एका कारणासाठी आवश्यक असते. ते कारण म्हणजे वाङ्मयाचे जेव्हा इतिहास लिहिले जातात, तेव्हा त्या इतिहास लेखनासाठी विविध काळातील 'समकालीन समीक्षा' मदतीला येत असते, येण्याची शक्यता असते. कारण कुठलेही इतिहास- अगदी वाङ्मयाचे इतिहासही - काही कालिक अंतरावरूनच लिहिले जातात. किंवा इतिहास लेखनासाठी असे कालिक अंतर असणे आवश्यक आहे, असे मानले जाते. कारण दूरवरून अधिक स्पष्ट दिसते. दिसू शकते. (अर्थात आता समकालिनांचे इतिहास लिहिण्याचेही प्रयत्न सुरू झालेले आहेत.)

लेखक ज्या काळात लिहितो, त्या काळात त्याच्याकडे जाणते-अजाणतेपणे दुर्लक्ष झाले, अगर हिणकस टीका झाली तर त्याचे परिणाम दूरगामी होतात. अगदी वाङ्मयाच्या इतिहासामध्येही त्यांचा उल्लेख येईलच असे नाही किंवा आलाच तर तो नीट येईल असेही नाही. या संदर्भातील पहिले उदाहरण म्हणून महात्मा फुले यांचेच देता येईल. महात्मा फुले यांच्याकडे तत्कालीन उच्चभ्रू समाजाने दुर्लक्ष केले, एवढेच नाही तर हिणकस पातळीवर जाऊन टीका केली. (ते ज्या समाजासाठी लिहीत होते, तो समाज तर आता आता कोठे रांगत होता) पुन्हा ही टीका करणारी माणसे काही साधीसुधी नव्हती. आपण मराठीचे शिवाजी आहोत, असे इंग्रजीत सांगणारी होती. परिणामी महात्मा फुले यांच्या वाङ्मयाची त्या काळात उपेक्षा तर झालीच, पण अजूनही मराठी वाङ्मयाच्या इतिहासात त्यांची कवी म्हणून, निबंधकार म्हणून, नाटककार म्हणून नोंद होत नाही. त्यांच्यावर स्वतंत्रपणे ग्रंथ लेखन होत असले तरी, वाङ्मयाच्या इतिहासामध्ये मात्र काही सुधारणा होत आहेत, असे दिसत नाही. एखादा अपवाद वगळता वाङ्मयाच्या इतिहासात महात्मा फुले यांची नीट नोंद होत आहे, असे म्हणता येत नाही.

वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने म. फुले उपेक्षित आहेतच, पण पुढे सत्यशोधक लेखनाची एक मोठी परंपरा निर्माण झाली, ते सारेच लेखक वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने अजूनही उपेक्षित/अस्पृश्य आहेत. कृष्णराव भालेकर, जवळकर, ताराबाई शिंदे, मुकुंदराव पाटील अशी एक भक्कम परंपरा सत्यशोधकी विचारधारेने प्रभावित झालेल्या लेखकांची आहे. पण ते काय लिहितात, कसे लिहितात, याचा शोध घेण्याची इच्छा वाङ्मयेतिहासाला अजूनही होत नाही.

सत्यशोधकी जलशाच्या पाठोपाठ आंबेडकरी जलसे आले. हे जलसे ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाचे आहेत. एक तर लोकनाट्याचे ते वेगळे आविष्कार आहेत, तसेच दलित नाट्यचळवळीची ती प्रारंभिक रूपे आहेत. परंतु त्यांचा विचार करावा असे अजूनही आमच्या वाङ्मयेतिहासाला वाटत नाही. एवढेच नाही तर कामगार रंगभूमीची, ग्रामीण रंगभूमीची एक प्रदीर्घ परंपरा महाराष्ट्रात आहे. पैकी केवळ कामगार रंगभूमीचा फक्त उल्लेख तेवढा केला जातो. कारण पांढरपेशांची रंगभूमी म्हणजे रंगभूमी अशी संकल्पना वाङ्मयेतिहासकारांच्या डोक्यात असते.

समाजजीवनामध्ये जशा चळवळी निर्माण होतात, तशाच त्या वाङ्मयामध्येही निर्माण होत असतात. या दृष्टीने विचार करता सत्यशोधक साहित्याची चळवळ ही आधुनिक मराठी साहित्यातील पहिली चळवळ होती. परंतु तिची नोंद घ्यायचीच नाही, असे ठरविल्यानंतर पुढच्या चळवळींची नोंद घेण्याचेही काही कारण उरले नाही. पुढे गांधीवादी आणि मार्क्सवादी विचारांनी प्रभावित असलेले साहित्य आले. याही चळवळीच होत्या. स्वातंत्र्यानंतर ग्रामीण, दलित, स्त्रीवादी अशा चळवळी निर्माण झाल्या. या चळवळींमुळे मराठी साहित्याचा मध्यमवर्गीय पोत बदलण्यास खूपच मदत झाली. परंतु या चळवळींचीही नीट नोंद घ्यावी, असे वाङ्मयेतिहासास वाटत नाही.

नवसाहित्य, नवसमीक्षा, अस्तित्ववाद इत्यादीसंबंधी भरभरून बोलणारे वाङ्मयेतिहास (आणि समीक्षकही) इथल्या मातीतून निर्माण झालेल्या चळवळींसंबंधी आणि त्यांच्या प्रेरणेतून निर्माण झालेल्या साहित्यासंबंधी नीट मांडणी करावयास तयार नाहीत. (क्वचित काही विद्यापीठांमधून तुकड्यातुकड्यांनी अभ्यास होतो)





अनुक्रमणिका

चळवळींमागील सामाजिक संघर्ष आणि त्याला मिळणारे वाङ्मयीन रूप यांची चिकित्सा करावयास तयार नाहीत.

चळवळींबद्दल जसे आहे, त्याप्रमाणेच अनेक लेखकांबद्दलही असेच म्हणता येईल.

वाङ्मयेतिहासासंबंधी गंभीरपणे विचार करण्याचे कारण असे की, विद्यापीठीय अभ्यासक्रमांचा भाग म्हणून वाङ्मयेतिहास शिकवले जातात. विद्यापीठात शिकून शिक्षक झालेले लोक पुन्हा तोच वाङ्मयेतिहास शिकवीत राहतात. त्यामुळे पन्नास पन्नास वर्षे तीच तीच मते व्यक्त होत राहतात. तेच तेच लेखक युगप्रवर्तक, महत्त्वाचे इत्यादी असतात. परिणामत: त्याच कालखंडात लिहिणारे, महत्त्वाचे लिहिणारे लेखकही विचारकक्षांच्या बाहेर राहतात. ताराबाई शिंदे, पं. रमाबाई, मुकुंदराव पाटील (यांच्या कादंबऱ्या), शंकरराव खरात आणि अण्णा भाऊ साठे, मनोहर शहाणे, किरण नगरकर, भालचंद्र लोवलेकर असे आणि यांसारखे असंख्य लेखक वाङ्मयेतिहासाच्या बाहेर राहतात.

वाङ्मयेतिहास अभ्यासक्रमाचे भाग असल्यामुळे त्याचे परिणाम कसे होऊ शकतात, याचा ओझरता उल्लेख वर केला आहे. शिवाय अनेक अभ्यासक, विशेषत: परभाषिक अभ्यासक वाङ्मयेतिहास पाहत, अभ्यासत असतात. त्यामुळे अपुरे इतिहास अशा अभ्यासकांची तसेच विद्यार्थ्यांची दिशाभूल करण्याचे काम चोखपणे बजावतात!

इतिहास-वाङ्मयेतिहास वेगवेगळ्या दृष्टिकोनांमधून लिहिले जाऊ शकतात. तसेच ते वाङ्मयप्रकारांच्या अनुसार तसेच प्रवाहांच्या, चळवळींच्या अनुषंगाने लिहिले जाऊ शकतात. कुठल्याही प्रकारे वाङ्मयेतिहास लिहिले तरी त्यात लेखकाने लावलेली व्यवस्था असते. म्हणजे व्यवस्थेच्या अनुषंगाने सिद्ध केलेला तो वाङ्मयेतिहास असतो. असे असले तरी सामग्र्याचे भान वाङ्मयेतिहासकाराला असणे आवश्यक असते. असे सामग्र्याचे भान असेल तर वेगवेगळ्या विचारसरणींच्या अनुषंगाने लिहिलेल्या साहित्याचा परामर्श घेणे वाङ्मयेतिहास लेखकाला आवश्यक वाटेल. तो हितसंबंधांच्या पलीकडे जाऊ शकेल असे वाटते. नाही तर जो विचारव्यूह आपल्या हितसंबंधांच्या आड येतो, त्याचा उल्लेखच करायचा नाही, असे धोरण अवलंबिले जाऊ शकते. म्हणून सामग्र्याचे भान गरजेचे असते.

दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे वाङ्मयेतिहास लेखक नेहमी स्वागतशील असला पाहिजे. म्हणजे मध्ययुगाचा इतिहास लिहिताना जर एखादे हस्तलिखित सापडले तर अस्तित्वात असलेला इतिहास बदलतो अगर त्यात भर पडू शकते. उदाहरणार्थ, बाराव्या तेराव्या शतकातील 'उखाहरण' हे काव्य कोणाला सापडत नव्हते. राजवाड्यांना त्याची काही पाने सापडली होती. परंतु डॉ. यू. म. पठाण यांना संपूर्ण 'उखाहरण' सापडले. त्यांचे त्यांनी संपादन केले व ते प्रसिद्ध केले.

हे 'उखाहरण' पाहताना असे लक्षात येते की, हे काव्य बाराव्या तेराव्या शतकातील म्हणजे 'ज्ञानेश्वरी' समकालीन असून शक्तिसांप्रदायिकाने लिहिलेले आहे. ही बाब लक्षात घेतली की बाराव्या तेराव्या शतकामध्ये महानुभाव, वारकरी सांप्रदायिकांबरोबरच शक्तिसांप्रदायिकही उत्तम वाङ्मयनिर्मिती करू शकत होते. म्हणजे मध्ययुगीन मराठी वाङ्मयेतिहासात भर पडू शकते. परंतु या काव्याची म्हणावी तशी नोंद घेतली गेली नाही. असे का व्हावे, याची कारणे शोधणे गरजेचे वाटते. अर्थात ही कारणे मात्र गंभीर असतील, याचा काहीएक अंदाज आपल्याला येऊ शकतो.

मध्ययुगाच्या संदर्भात जसे आहे, त्याप्रमाणेच आधुनिक वाङ्मयाच्या संदर्भातही असू शकते. उदाहरणार्थ, नवकथेची मीमांसा केवळ चार लेखकांना केंद्रस्थानी ठेवण्यासाठी केली गेलेली आहे, हे लक्षात आले की त्या काळातील इतर लेखकांचा समावेश नवकथेमध्ये करता येऊ शकतो, हे लक्षात येते. एवढेच नाही, तर नवकथेची व्याप्ती वाढून मराठी कथेची समृद्धीही लक्षात येऊ शकते. म्हणजे सामग्र्याचे भान त्याला असेल तरच हे घडू शकेल.

याचा अर्थ असा, की एकदा सिद्ध झालेला वाङ्मयेतिहास हा कधीच अंतिम असत नाही. त्यात बदल होणार, भर पडणार, त्यातील काही मीमांसा चुकीच्या, अपुऱ्या आहेत असेही जाणवणार. म्हणून वाङ्मयेतिहास हे नेहमीच अपुरे आहेत, एका विशिष्ट काळाची ती निर्मिती आहे, असे गृहीत धरून ते पुन्हा पुन्हा लिहिले गेले पाहिजेत.

मराठीत तरी सामग्र्याचे भान असणारे आणि स्वागतशील दृष्टिकोन असणारे वाङ्मयेतिहास निर्माण होताना दिसत नाहीत. त्यामुळे उपेक्षा आणि पक्षपात यांनी हे वाङ्मयेतिहास समृद्ध झालेले आणि हितसंबंधांच्या जंजाळात अडकलेले दिसतात!

या सर्व विवेचनाचा इत्यर्थ एवढाच की, राजकीय इतिहासामध्ये जसे उपलब्ध साधने उलटसुलट फिरवून किंवा काही साधने नष्ट करून (कागद गिळणारे इतिहासकार महाराष्ट्रात निर्माण झालेले होते!), सोयीची साधने तेवढी वापरून एका विशिष्ट हेतूने इतिहास सिद्ध केले जातात, तसे प्रकार कुठल्याही इतिहासात म्हणजे सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक इतिहासाबाबत होऊ शकतात. वाङ्मयेतिहासासंदर्भात तर ते अनेकदा स्पष्टच दिसते.

●



अनुक्रमणिका



लेख

डॉ. नीलिमा गुंडी



**यवतमाळ येथे होणाऱ्या ९२व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी ख्यातकीर्त साहित्यिक, संशोधक, समीक्षक डॉ. अरुणा ढेरे यांची सन्मानपूर्वक निवड झाली. डॉ. अरुणा ढेरे यांच्या साहित्यिक कर्तृत्वाचा डॉ. नीलिमा गुंडी यांनी घेतलेला विचक्षण वेध.**



# डॉ. अरुणा ढेरे यांचे साहित्य : बहुमुखी प्रतिभेचे दर्शन

डॉ. अरुणा ढेरे या सुमारे चाळीस वर्षे सातत्याने कसदार लेखन करीत आहेत. त्यांनी विविध वाङ्मयप्रकार समर्थपणे हाताळले असून त्यांच्या पुस्तकांची संख्या पन्नासच्या आसपास आहे. त्यांच्या लेखनाला आजवर लोकमान्यता मिळाली आहे आणि अनेक पुरस्कारांच्या रूपाने राजमान्यतेची मोहरही त्यावर उमटली आहे. त्यांच्या लेखनातून त्यांच्या बहुमुखी प्रतिभेचे प्रत्ययकारी दर्शन घडते. कविमनाचा पिंड असलेली त्यांची लेखणी काव्याबरोबरच ललित लेखन, कथाकादंबरी, सामाजिक इतिहासपर संशोधन, बालवाङ्मय, संपादन, समीक्षा आदी साहित्यक्षेत्रातही लीलया संचार करीत आली आहे. यवतमाळ येथे होणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची सन्माननीयरीत्या एकमताने निवड झाली, ही घटना स्वागतार्ह आहे. येथे एका लेखाच्या मर्यादेत त्यांच्या समग्र साहित्यावर दृष्टिक्षेप टाकताना त्यांच्या लेखनाची ठळक वैशिष्ट्ये लक्षात आणून देण्यावर भर दिला आहे.

**साहित्य-निर्मितिप्रेरणा आणि स्वरूप**

अरुणा ढेरे यांच्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वाचा गाभा 'कवयित्री' या स्वरूपाचा आहे. 'प्रारंभ', 'यक्षरात्र', 'निरंजन', 'जावे जन्माकडे' आणि 'निळ्या पारदर्शक अंधारात' हे त्यांचे कवितासंग्रह आहेत. त्यांच्या काव्यातून त्यांची सौंदर्यवादी मनोवृत्ती नितळपणे व्यक्त झाली आहे. मात्र स्त्रियांच्या साहित्यातील सौंदर्यवृत्तीमागे प्रबोधनयुगात जाग्या झालेल्या व्यक्तिमत्त्वाच्या नवजाणिवेचे स्फुरणही नकळत आहे, हे लक्षात घ्यावे लागते. त्यामुळे त्यांच्या काव्यातील जाणिवांमागे आधुनिक मनाचे स्पंदनही आहे. प्रेम, स्त्रीपुरुष नातेसंबंध, जीवनरहस्याचा वेध, निसर्गसंवेदन अशा विविध अनुभवांना अभिव्यक्त करणाऱ्या त्यांच्या कविता त्यातील उत्कटता आणि संवेद्य प्रतिमा यांच्यामुळे लक्षवेधी ठरल्या आहेत.



*''चूड प्राणांची लावून कर आयुष्याची होळी*
*तेव्हा कुठे जुळतील दोन कवितेच्या ओळी''* (यक्षरात्र)

हीं त्यांची काव्यविषयक धारणा आहे.

अरुणा ढेरे यांच्या ललित लेखनामागेही त्यांच्या कविमनाचे स्फुरणच केंद्रस्थानी आहे. 'लावण्ययात्रा', 'रूपोत्सव', 'मनातले आभाळ', 'वेगळी माती, वेगळा वास' 'कवितेच्या वाटेवर' आदी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. निसर्गसंवेदन,



अनुक्रमणिका

व्यक्तिचित्रण, प्रवासानुभव, कलांचे रसग्रहण अशा प्रकारचे अनुभव त्यात आहेत. या लेखनातून त्यांचे रसज्ञ मन लक्ष वेधून घेते. त्यांची कलेतील किंवा निसर्गातील सौंदर्याचे मर्मग्रहण करण्याची क्षमता आणि शब्दांद्वारे त्याचा वाचकांना प्रत्यय देण्याची क्षमता उल्लेखनीय आहे. ललित लेखांना एकच एक बांधीव आकार नसतो. त्याची सैलसर वीण ही लेखकाच्या संवेदनस्वभावाचा आवाका आणि पीळ दर्शवणारी असते. या दृष्टीने पाहता त्यांच्या साध्याशा लेखात किती वेगवेगळ्या पातळीवरचे संदर्भ लेखिकेने कलात्मक रूपात आत्मसात केलेले असतात, हे पाहण्याजोगे आहे. उदा. 'तहान'सारखा लेख पाहावा. कवितेतले उपमान (उदा. भुंगा), प्राचीन मंदिरे, 'कधी रे येशिल तू'सारखे गीत, 'यमुनातीरीचे बुलबुल' अशा विविध कलांशी निगडित त्यांचे लेख त्यांच्या आस्वादक शैलीमुळे प्रत्ययकारी झाले आहेत. मौखिक परंपरेचा आणि लोकसाहित्याचा वारसा घरातूनच मिळाल्यामुळे त्यांच्या या प्रकारच्या लेखनातही नावीन्य उमटले आहे. त्यांच्या साहित्यनिर्मितीमागे कळतनकळत कार्यरत असणाऱ्या प्रेरणा बहुविध स्वरूपाच्या आहेत. कलावंतमनाच्या संवेदनशील कल्पनाशक्तीच्या स्पर्शाने त्यांचे ललित लेखन व काव्य जसे उठून दिसते, तसेच प्रज्ञा आणि व्यासंगाच्या बळावर केलेले त्यांचे सामाजिक इतिहासपर असे संशोधनात्मक लेखनही उठून दिसते. उदा. 'विस्मृतिचित्रे'. काही वेळा त्यांच्यातल्या या द्विविध प्रेरणा एकसंधपणेही प्रगटल्या आहेत. त्यांच्या 'कृष्णकिनारा' (कथा), 'मैत्रेयी', 'उर्वशी', 'महाद्वार' या कादंबऱ्या वाचताना हा अनुभव वाचकांना येतो. त्यांचा पीएच.डी. पदवीसाठीचा प्रबंध आदिबंधात्मक समीक्षा-पद्धतीविषयीचा (पाहा : 'काळोखाचे कवडसे') - आंतरविद्याशाखीय अभ्यासशाखेचा- होता. त्यामुळे कला-शास्त्र, लालित्य-संशोधन यातील कप्पेबंदपणा नाकारून विषयाला स्वतःच्या पद्धतीने भिडण्याची प्रेरणा त्यांच्या लेखनात आढळते. एका बाजूने आधुनिक वृत्तीचे आत्मभान तल्लख ठेवताना लोकसाहित्यातून रुजलेली, सर्वांशी जोडून घेण्याची वृत्तीही त्यांनी कायम राखली आहे. त्यामुळे आत्यंतिक व्यक्तिवादातून येणारे एकारलेपण दूर राखून व्यक्तिसमष्टीतील आंतरसंबंधांचे दुवे - तेही गतकालापासून आजपर्यंत- डोळसपणे जोडण्याचे काम त्यांच्या लेखनातून घडताना दिसते. त्यांच्या 'कृष्णकिनारा'चा हिंदी व गुजरातीत अनुवाद झाला असून गुजराती अनुवादाच्या पाच आवृत्त्या निघाल्या आहेत.

**पुराणप्रतिमांचे आधुनिक दृष्टीने वाचन**

अरुणा ढेरे यांचे बरेचसे साहित्य स्त्रीकेंद्री आहे. त्यातही रामायण-महाभारतातील नायिका, प्राचीन कालातील संत स्त्रिया याचबरोबर गेल्या दोन शतकांतील कर्तृत्ववान स्त्रिया असा विविध क्षेत्रांतील स्त्रियांविषयी त्यांनी लिहिले आहे. पुराणकथांतील स्त्रीप्रतिमांचे त्यांनी आधुनिक दृष्टीने केलेले वाचन महत्त्वपूर्ण आहे. 'कृष्णकिनारा'च्या मनोगतात त्यांनी लिहिले आहे की, आपल्याकडच्या कथांमध्ये 'अंधाराची तळघरं' आहेत आणि तिथे पुष्कळ बायका मरून पडलेल्या त्यांनी पाहिल्या आहेत. त्यांच्या कथा, कादंबऱ्या आणि ललित लेख, कविता यामध्येही अशा स्त्रियांना त्यांनी आधुनिक संवेदनेनिशी जाणून घ्यायचा प्रयत्न केला आहे. 'उर्वशी' या कादंबरीत त्यांनी अप्सरेच्या मनातल्या स्त्रीत्वाची दुखरी नस नेमकी पकडली आहे. 'कृष्णकिनारा' या कथासंग्रहात त्यांनी राधा, कुंती आणि द्रौपदी या तिघींच्या कथा लिहिल्या आहेत. यातली द्रौपदी कृष्णाला म्हणते, ''तुझ्या 'पूर्णपुरुष' असण्यामुळे तुझ्यात एक फार फार मोठी उणीव आहे. तुला अर्धी स्त्री नाही होता येत. तू समजू शकत नाहीस बाईपणाच्या कळा.'' यामागे मानसशास्त्रातली संकल्पना गृहीत आहे. प्रत्येक व्यक्तीत अनिमा आणि अनिमस या रूपात स्त्रीत्व आणि पुरुषत्व असते. ही ती संकल्पना आहे. लेखिकेने 'सीतेची गोष्ट' ही अशीच स्वतःच्या नजरेतून कथन केली आहे आणि त्यात अर्थपूर्णता आणली आहे. 'काळोख आणि पाणी'मध्ये अरुणा ढेरे यांच्यातली शोधक प्रतिमा जाणवते. महाभारतविषयक विविध संदर्भसाधनांतून सामग्री मिळवत, मिथकांचा धांडोळा घेताना त्या व्यक्तीच्या गाभ्याशी पोहोचतात. त्यांनी यात 'माधवीची गोष्ट' सांगितली आहे. पुढे इतर भाषांमध्ये माधवीवर कादंबरी, काव्यलेखन झाले पण त्यांनी हा लेख 'ललित'च्या १९९०च्या दिवाळी अंकात लिहिलेला आहे!

त्यांच्या 'स्त्री आणि संस्कृती' या पुस्तकातही अशा प्रकारचे लेख आहेत. त्यातील 'ओव्यांमधली रुक्मिणी', 'आदिमाया', 'भूमिकन्या', 'आदी स्त्रीच्या डोळ्यातलं तेज' (गांधारीविषयीचा लेख) इत्यादी लेख वाचनीय आहेत. त्यातल्या 'एका लोककथेच्या निमित्ताने' या लेखात सीतेने दशरथाच्या केलेल्या पिंडदानाची कृत्तिवास रामायणातली कथा त्या सांगतात आणि पिंडदान करण्याचा अधिकार स्त्रीला नसणे, सत्यासाठी पुरावे न मिळणे अशा वास्तवावर बोट ठेवत लोककथेतला शाश्वत स्वर लक्षात आणून देतात. त्यांच्या काही लेखांमध्ये समकालीन संदर्भही पुराणकथांच्या



अनुक्रमणिका

प्रकाशात असे ताडून पाहिलेले दिसतात.

**आधुनिक मनाचे स्पंदन**

अरुणा ढेरे यांच्या लेखनात प्राचीन साहित्य आणि लोकसाहित्य याचा अभ्यास आणि प्रसंगी नवे आकलन जसे आहे, तसेच अस्सल आधुनिक मनाचे स्पंदनही आहे. त्या 'बापलेकी' या पुस्तकात (संपा. पद्मजा फाटक) आपल्या वडिलांविषयी ज्येष्ठ संशोधक डॉ. रा. चिं. ढेरे यांच्याविषयी-लिहिताना म्हणतात- "माझ्यातल्या लिहिणाऱ्या मुलीला जगाशी स्वतःला जोडताना सतत अस्वस्थ होण्याचा शाप आहे." ही अस्वस्थता ही त्यांच्यातल्या आधुनिकतेचे स्पंदन आहे. ते स्पंदन त्यांच्या कवितेतही उमटते. त्या विठ्ठलाला आतून पिळवटून जाऊन म्हणतात,



१२व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल मा. अरुणा ढेरे यांचा महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे सत्कार करताना कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी. समवेत डावीकडून प्रकाश पायगुडे, उल्हास पवार, सुनिताराजे पवार, नीलिमा गुंडी

*"रस्त्यांवर उभी राहून शिव्या देऊ शकत नाही*
*मी तुला जनीसारखी*
*नाही बोटे मोडू शकत तुझ्या नावाने*
*की करू शकत नाही मग्रूर दुर्लक्ष धीट तुच्छतेने*
*जिच्या बदल्यात तू देतोस समाधानाचे आंधळे भास*
*ती विप्रश्न लीनता नाही माझ्याजवळ*
*किंवा नाही निरागस विश्वास"*

(निळ्या पारदर्शक अंधारात)

याच आधुनिक वृत्तीतून आलेल्या ज्ञानलालसेने त्यांच्या लेखनाला एक वेगळीच झळाळी आली आहे. त्यांच्या सामाजिक इतिहासपर लेखनात त्यांच्या संशोधनाची आभा पसरून राहिली आहे. 'विस्मृतिचित्रे', 'प्रकाशाचे गाणे', 'विवेक आणि विद्रोह', 'जाणिवा जाग्या होताना', 'त्यांची झेप, त्यांचे अवकाश' ही त्यांची पुस्तके आणि 'डॉ. विश्राम रामजी घोले आणि त्यांचा परिवार' हा चरित्रात्मक शोधप्रकल्प वाचताना याची खात्री पटते. त्यांचे हे लेखन ससंदर्भ, सप्रमाण आहे. 'विस्मृतिचित्रे'मध्ये त्यांनी गेल्या दोन शतकातील सामान्य घटना, व्यक्ती आणि तपशील यांच्याकडे कालपटाचा रंग आणि पोत ठरवणारी मूलद्रव्ये म्हणून पाहिले आहे. तलस्पर्शी दृष्टिकोनातून केलेले हे इतिहासाचे वाचन अर्थातच नव्या तथ्यांवर प्रकाश टाकते. सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रियेतील आवेग आणि भोवरे समोर ठेवते. यातील कृष्णाबाई केळवकर, रेबेका सिमियन, सरलादेवी राय, काशीबाई हेरलेकर आदींविषयीचे लेख वाचकांच्या ज्ञानात भर घालणारे आहेत. 'त्यांची झेप आणि त्यांचे अवकाश'मध्ये त्यांनी गेल्या दोन शतकातील विविध क्षेत्रांमध्ये लक्षणीय कर्तृत्व गाजवलेल्या भारतीय स्त्रियांच्या चरित्रकथा सादर केल्या आहेत. त्यात रुकैया हुसेन, नौटंकीवाली गुलाबबाई, नूर इनायत खान आदींना स्थान मिळाले आहे. 'विवेक आणि विद्रोह'मध्ये विवेकी सुधारणावादाच्या इतिहासाविषयी लिहिताना देवदासी प्रश्न, मंदिरप्रवेशाचा सत्याग्रह, समुद्रपर्यटनाचे पाप, प्रौढविवाह, स्त्रीशिक्षणातील अडसर अशा अनेक प्रश्नांभोवतीचे विचारमंथन व कृतिकार्यक्रम यांची दखल घेतली आहे. त्यांच्या इतर पुस्तकांतूनही त्यांनी यशोदाबाई भट, जनाक्का शिंदे, विठाबाई चौधरी, सावित्रीबाई रोडे, सुंदराबाई पवार, विनोदिनी गायकवाड, राधाबाई शेवडे अशा अनेकजणींविषयी लिहिले आहे. उत्कट ज्ञानलालसेमुळेच त्यांना वाक्आम्भृणी, मैत्रेयी अशा प्राचीन काळातील स्त्रियांचाही शोध घ्यावासा वाटला आहे. त्यांच्या स्त्रीकेंद्री समग्र संशोधनपर लेखनाचा पट पाहता स्थल, काल आणि सामाजिक स्तर याबाबतीतले त्यातले वैविध्य लक्षवेधी ठरते. लेखिकेच्या संवेदनशीलतेचा पैस किती मोठा आहे, याची कल्पना त्यातून येते. मुख्य म्हणजे त्यांनी 'डॉ. रा. चिं. ढेरे संस्कृति संशोधन केंद्रा'ची स्थापना करून त्याद्वारे समाजात ज्ञानज्योत तेवत राहील, याची तरतूदही केलेली दिसते.

**कलात्मक साहसी वृत्ती**

अरुणा ढेरे यांच्या समग्र लेखनावर दृष्टिक्षेप टाकता त्यांचे एक वैशिष्ट्य आढळते, ते म्हणजे कसलाही आव न आणता आणि कसलाही अभिनिवेश न बाळगता

त्यांच्याकडे एक कलात्मक साहसी वृत्ती आहे. त्या वृत्तीमागे निखळ आणि निकोप असे जगण्याविषयीचे कुतूहल आहे. त्यामुळे त्या कुतूहलातून त्यांची सर्जनशील प्रेरणा जागृत होते. आणि अंधाराला भिडण्याचे साहस त्यांना करावेसे वाटते. 'यक्षरात्र', 'निळ्या पारदर्शक अंधारात' हे त्यांचे कवितासंग्रह या दृष्टीने शीर्षकासकट महत्त्वाचे आहेत. त्यांना प्रश्न पडतो-

*''हाती लागला आहे अंधाराचा भक्कम, जाड दोर*
*जाऊ का याला धरून त्या ब्रह्मगुहेकडे?*
*करू का संज्ञेनंतरचे एक साहस वेडे?''*

(जावे जन्माकडे)

अशा प्रकारे त्यांनी अनेक कवितांमध्ये विश्वरहस्याच्या गूढ काळोखाचा वेध घ्यायचा प्रयत्न केला आहे.

अंधार हा दरवेळी एकाच वजनाचा आणि पोताचा नसतो. समूहमनातला नेणिवेचा अंधार हाही लेखिकेला खुणावत राहिलेला दिसतो. 'काळोखाचे कवडसे', 'काळोख आणि पाणी' या पुस्तकांमधून त्यांनी या अंधाराचा तळ शोधायचा साहसी प्रयत्न केला आहे. रामायण महाभारतापासून चिं. त्र्यं. खानोलकरांच्या कादंबऱ्यांपर्यंत त्यांचे हे अंधारवाचन चालू आहे. आणखीही एक प्रकारचा अंधार असतो. तो असतो विस्मृतीचा! त्या अंधाराचे तर त्यांनी उत्खननच केले असून त्यातून विस्मृतीत गेलेली रत्ने वेचली आहेत. कधी 'प्रकाशाचे गाणे' गायले आहे; तर कधी 'अंधारातले दिवे' स्मृतींतून तेवत ठेवले आहेत.

लेखिकेतील कलात्मक साहसी वृत्ती केवळ स्त्रीकेंद्री लेखनापुरतीच मर्यादित नाही. स्त्रीपुरुषनात्यातील 'रूपमाया' त्यांना जाणून घ्यावीशी वाटते. आपल्या समाजात निरभ्रपणे न पाहिल्या गेलेल्या या नात्याचे सूक्ष्म कंगोरे त्या सहृदयतेने लक्षात आणून देतात. म. गांधी, डॉ. आंबेडकर, गोपाळ कृष्ण गोखले, हरिभाऊ आपटे आदींच्या जगण्यातील स्त्रीपुरुषमैत्रीच्या फिकटगहिऱ्या छटा त्या वाचकांच्या जीवनजाणिवा विकसित करण्याच्या हेतूने उलगडून दाखवतात. या लेखनात निकोप कुतूहलजन्य साहस आणि वैचारिक प्रगल्भता यामुळे समतोल राखलेला आढळतो.

**लेखिकेचे श्रेय**

अरुणा ढेरे यांनी विविधांगी लेखन विपुल स्वरूपात केले आहे. त्याची साक्षेपी समीक्षा त्यांच्या अध्यक्षीय निवडीमुळे होईलच. येथे त्यांच्या लेखनाचे मला ठळकपणे जाणवणारे श्रेय आवर्जून नोंदवावेसे वाटते. मुख्य म्हणजे त्या वाचनसंस्कृतीच्या उपासक असलेल्या लेखिका आहेत. प्राक्कथांपासून 'अगेन्स्ट अवर विल' या बलात्काराच्या भीषण परिणामांची जाणीव करून देणाऱ्या समकालीन पुस्तकांपर्यंतचे संदर्भ त्यांच्या लेखनात कलात्मक आकार घेऊन प्रगट होतात. त्यांच्या काही साहित्यकृतींचा इतर काही भारतीय व परकीय भाषांमध्ये अनुवाद होत आहे, हे मराठी भाषेला अभिमानास्पद चित्र आहे.

अरुणा ढेरे यांनी स्त्रीवादी भूमिका घेतलेली नाही. तरीही त्यांच्या लेखनातून स्त्रीवादी सिद्धांताची भूमी भरभक्कम व्हायला पुष्टी मिळते. त्या ज्या संवेदनशीलतेतून मिथकांतील स्त्रियांना जिवंत करतात, त्यातून आपल्या धर्मपरंपरेतील काही अनिष्ट रूढी लक्षात येतात. उदा. 'माधवीची गोष्ट'मध्ये त्या काळाचे अंतर ओलांडून वडील ययाती यांनीच मुलीला स्वतःच्या स्वार्थासाठी चार राजांकडे विक्रेय वस्तूसारखे दिलेले पाहून लिहिले आहे - '' 'माधवी'चे हे व्यक्तिगत दुःख माझ्या मनात माझे होऊनच जिवंत झाले. तेव्हा मला माझ्या स्त्रीत्वाची लाजच बाजारात उघड्यावर मांडल्यासारखी वाटली.'' त्यांना या वेळी ज्या सामाजिक वास्तवाने बाईला वस्तूपण दिले, त्या पुरुषप्रभावी वास्तवाची जाणीव झाली आहे. तसेच डॉ. हेमवती सेनविषयी लिहिताना त्यांनी लक्षात आणून दिले आहे की, एका स्त्रीला वैद्यकीय शाखेचे सुवर्णपदक मिळणार हे मान्य न होऊन पुरुषविद्यार्थ्यांनी तेव्हा चक्क आंदोलन केले! म्हणूनच 'त्यांची झेप, त्यांचे अवकाश'च्या प्रास्ताविकात त्यांनी लिहिले आहे, ''रूढार्थाने आपण ज्या समाजाला पुरोगामी म्हणतो, त्या समाजाचे स्त्रियांच्या बाबतीतले धोरण कसे सूक्ष्मपणे प्रतिगामी, अनेकदा सावध, बचावात्मक आणि सोयीस्करपणे उदार राहिले आहे याचे प्रत्यंतरही वारंवार येते.'' हे विधान मोठे अर्थपूर्ण आहे.

अरुणा ढेरे यांच्या रूपाने एका सक्षम व्यक्तीची संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाली आहे. एका आशा आहे की, या निमित्ताने अकादमिक ज्ञानक्षेत्रात, तसेच समीक्षाव्यवहारात बऱ्याचदा (साहित्याचा एक उपप्रवाह म्हणून) परिघावर किंवा परिघाबाहेर राहणाऱ्या स्त्रीसाहित्याकडे योग्य ते लक्ष पुरविले जाईल! अरुणा ढेरे यांचे मनःपूर्वक अभिनंदन!

●

डॉ. नीलिमा गुंडी
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ,
पुणे ४११००२.
दूरध्वनी : ०२०-२४४८६०१५



अनुक्रमणिका








लेख

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# मायावादी भाष्यकार आचार्य पुरुषोत्तम



**महाराष्ट्राचे लाडके व्यक्तिमत्त्व पु. ल. देशपांडे यांच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाबद्दल तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'त लिहिलेला लेख. पु.लं.च्या जन्मशताब्दी निमित्ताने पुनर्मुद्रित करीत आहोत.**





पश्चिमी साहित्यशास्त्रात ललितकला किंवा ललितसाहित्य यांसंबंधी जे अनेक सिद्धांत सांगितलेले आहेत त्यांतील मला पटलेला एक सिद्धांत, 'काव्य किंवा ललितसाहित्य हे जीवनाचे भाष्य असते' हा होय. काव्य किंवा ललितसाहित्य हे वाच्यार्थाने भाष्य नसते, त्याचा भाष्य हा ध्वनितार्थ असतो.

पु. ल. देशपांडे यांनी आपल्या एका ललित लेखसंग्रहाला एक प्रास्ताविक पत्र जोडले आहे. ते असे-

''फ आणि ह

जन्म आणि मृत्यू ह्या दोन टोकांच्या मध्ये पकडून नियतीने चालविलेली आपणा साऱ्यांची फसवणूक एकदा लक्षात आली की, त्यातून सुटायला आपली आणि आपुलकीने भवताली जमणाऱ्या माणसांची 'हसवणूक' करण्यापलीकडे आणखी काय करायचं?''

शांकर वेदान्तातील माया शब्दाची व्याख्या साध्या सोप्या शब्दांत या पत्रात सांगितली आहे. पकडणारी आणि फसवणारी नियती म्हणजेच माया होय. या मायेचे कलात्मक आविष्करण पु.लं.च्या प्रथितयश साहित्यकृतीत आढळते. फसवणुकीने बहुशः आसूच येतात. परंतु हसू प्रसवणे ही कलाकाराची मोठीच किमया म्हटली पाहिजे.

शंकराचार्यांच्या शारीर भाष्याच्या प्रस्तावनेत, जीवन हे सत्यानृताचे मिथुन होय, असा सिद्धान्त मांडला आहे. अनृत म्हणजे संस्कृतमध्ये माया आणि मराठीत फसवणूक; - हे खोटे मायाजाल आहे, ही फसवणूक आहे, हे फसणाऱ्या पात्रांच्या लक्षात जेव्हा येते, तेव्हा फसणारी पात्रे बहुशः हसत नसतात तर प्रेक्षक हसत असतात. 'तुझे आहे तुजपाशी' (परी तू जागा चुकलासी) हे गंभीर सत्य 'आचार्यां'च्या लक्षात ज्या क्षणी येते, तेव्हा त्याचे मन विव्हल होते. तेव्हा प्रेक्षकांचेही मन विव्हल व्हावयास पाहिजे; काही थोड्यांचे विव्हल होतेसुद्धा. परंतु सामान्य प्रेक्षकांच्या मनाची दीर्घकालिक विनोदी संदर्भाने फसवणूक होते व ते हसतच राहतात.

या भाष्यकाराने आपल्या स्वतःच्या साहित्याबद्दल वर निर्दिष्ट केलेल्या पत्रात्मक प्रास्ताविकामध्ये 'सौंदर्यवाचक विधान' केले आहे. ते सबंध पत्रच सौंदर्यवाचक विधान आहे; व पु. लं.च्या साहित्याचे 'व्यवच्छेदक लक्षण' आहे. भारतीय काव्यशास्त्राच्या परिभाषेत म्हणावयाचे तर या सौंदर्यवाचक विधानातून पु. लं.च्या साहित्याचा स्थायीभाव सूचित होतो. नैतिक सत्यांची ओढ हा पु. ल. तथा साहित्याचा स्थायीभाव आहे, ही गोष्ट ध्वनित होते. हा ध्वनितार्थ विश्लेषणात्मक पद्धतीने निघतो. कांटने वाक्यांचे किंवा विधानांचे दोन प्रकार सांगितले आहेत : (१) विश्लेषणात्मक व (२) संश्लेषणात्मक. उद्देशपदाच्या



अनुक्रमणिका








पृथक्करणातून विधेयपद निघते, त्या विधानास विश्लेषणात्मक म्हणतात. उदा. गाय हा सस्तन प्राणी आहे. या विधानातील सस्तन प्राणी हा अर्थ गाय या पदाच्या व्याख्येत असतो व विश्लेषणात स्पष्ट होतो. 'वासुदेव व्याकरणशास्त्री आहे' हे विधान संश्लेषणात्मक आहे; कारण 'वासुदेव' या उद्देशपदाच्या व्याख्येत व्याकरणशास्त्री हे पद अंतर्भूत नसते. वरील पत्रातील 'फसवणूक' या पदाच्या व्याख्येतच 'सत्याच्या विपरीत' असा अर्थ नियमाने अंतर्भूत आहे. काहीतरी वास्तव किंवा सत्य आहे हे गृहीत धरण्याशिवाय फसवणुकीची कल्पना करताच येत नाही. रज्जूवर सर्पाचा भास होतो म्हणजे फसवणूक होते ही गोष्ट रज्जू ही वस्तुस्थिती गृहीत धरल्याशिवाय मानताच येत नाही. शिंपल्यावर रुप्याचा भास होतो म्हणजे फसवणूक होते, असे आपण जेव्हा म्हणतो, तेव्हा शिंपले ही वस्तुस्थिती सापडावी लागते.

पु.लं.च्या साहित्यातील सत्य हे शांकरभाष्यातील परमार्थ सत्य किंवा ज्ञान-विज्ञानातील सत्य आहे की नाही याबद्दल वाद होऊ शकेल, परंतु जीवनातील नैतिक सत्याबद्दल वाद होणार नाही. उदा. पु.लं.चे 'गणगोत' हे गाजलेले पुस्तक घ्या किंवा 'व्यक्ती आणि वल्ली' हे पुस्तक घ्या. 'गणगोत'मध्ये वास्तव व्यक्तिचित्रे आहेत व 'व्यक्ती व वल्ली' यात काल्पनिक व्यक्तिचित्रे आहेत. त्या दोन्हीमध्ये माणुसकीचा जिव्हाळा ओतप्रोत भरला आहे. त्या त्या वास्तव किंवा काल्पनिक व्यक्तींच्या जीवनातील मूल्यांचा किंवा नैतिक रहस्यांचा आविष्कार आहे. त्यात साधीभोळी सांसारिक माणसे आहेत; काही व्यवहारी यशस्वी माणसे आहेत. ज्यांचे व्यक्तिमत्त्व विकसित आहे अशाही व्यक्ती आहेत; काहींच्या ठिकाणी तर भगवद्‌गीतेतील विभूतिमत्वही प्रकट झाले आहे. 'मला दिसलेले विनोबा' आणि 'दया छाया घे' ...या दोन व्यक्तिचित्रांतून या साहित्यकाराच्या अंतिम निष्ठेचे दर्शन होते. विनोबांच्या पदयात्रेचे चित्रण अशी ग्वाही देते की, 'तुझे आहे तुजपाशी' यामधील मुख्य आशय गांधीवादाचे विडंबन हा नव्हे. गांधींची तीन आंदोलने आणि विनोबांचे भूदान आंदोलन या सर्व गोष्टींनी या कलाकाराच्या हृदयाचा कायम ठाव घेतलेला आहे. वैयक्तिक, सामाजिक, नैतिक आदर्शांची विलक्षण ओढ या कलाकाराला लागली आहे याची साक्ष निरनिराळ्या संदर्भात तर मिळतेच, परंतु विनोबांच्या पदयात्रेवरील या लेखात संपूर्णपणे मिळते. परंतु या निष्ठेचा अर्थ बालगंधर्वावरील 'दया छाया घे' या व्यक्तिचित्रणात पूर्ण स्पष्ट होतो. कलात्मक सौंदर्य ही त्यांची अंतिम निष्ठा आहे आणि या कलामूल्याचा आशय नैतिक सत्य होय हे ठरते.

वास्तव-व्यक्तीविषयक अनेक लेखांत वर्ण्यव्यक्तींच्या दोषांकडे काना (णा) डोळा पु.लं. नी केलेला दिसतो, असा त्यांच्यावर काहीसा आक्षेप आहे. परंतु त्या आक्षेपांचे निरसन कल्पित व्यक्तींच्या, त्यांनी केलेल्या दोषदर्शनाने होते. वास्तव व्यक्तीविषयक लेखनात त्यांचा भर गुणग्राहकतेवर असतो. कल्पित व्यक्तींची मने दुखविली तरी चालतात, परंतु वास्तव-व्यक्तीची व ज्यांच्यासंबंधी जनांची अंतःकरणे राखणे किंवा न दुखवतील अशी खबरदारी घेणे हेच योग्य, अशी त्यांची धारणा असावीसे दिसते. 'तुझे आहे तुजपाशी' या नाटकातला आचार्य कल्पित की वास्तवातला? रंगभूमीवरील आचार्य भूमिका घेतलेल्या पात्रानं एका तत्कालीन विद्यमान आचार्यांचा अभिनय वा हावभाव उचलल्यामुळे त्या आचार्यांचे मित्र व संबंधी रागावले, परंतु हा पु.लं.चा दोष नव्हे. हे ते नाटक वाचणाऱ्या वाचकास सांगण्याची आवश्यकता नाही.

नव्या भारताचे व आधुनिक मानवसमाजाचे नैतिक आदर्श हे पु. लं. चे कलेच्या मूल्यात रूपांतर पावलेले निकष होते. आधुनिक मराठी साहित्यात विनोदी साहित्यकारांच्या तीन पिढ्या झाल्या, ही चौथी. विनोदी साहित्याला प्रतिष्ठा प्रथम श्रीपाद कृष्णांनी दिली. तत्पूर्वीचा विनोद एक तर विदूषकी तरी असायचा किंवा तमाशाचा तरी असायचा. श्रीपाद कृष्णांनी त्याच्यात सामाजिक टीकेचा आशय ओतून शिष्ट म्हणजे सुशिक्षित वर्गाची मान्यता मिळवून दिली. दुसरी पिढी गडकरी व तिसरी पिढी अत्रे यांची. त्यांनी सुशिक्षितांना विनोदाचे वेड लावले. परंतु या दुसऱ्या व तिसऱ्या पिढीच्या विनोदाला सामाजिक टीकेचा विसर पडला. कारण गडकरी किंवा अत्रे यांच्या श्रद्धा परंपरागत रूढीशी एकरूप झालेल्या होत्या. गुरू श्रीपाद कृष्ण हे सुधारकांचे पाठीराखे तर शिष्य व प्रशिष्य सनातनी कर्मठांच्या पाठीशी उभे. पु.लं.नी विनोदाला श्रीपाद कृष्णांचा मागोवा घेत त्यांच्याही फार पुढे नेऊन अधिक उच्च पदवीवर नेऊन बसविले. त्यांनी नव्या बदलत्या स्वतंत्र भारताच्या व आधुनिक मानवी समाजाच्या आदर्शांकडे आकर्षित केले आहे.

एकच व्यक्ती बहुरूपी बनते या बाबतीत पु.लं.चे यश हे अप्रतिम आहे. एकच बहुरूपी बनतो. 'एकं सत्' हा मायावादाचा सिद्धान्त आहे. त्यांनी यशस्वी नट व नाटककार म्हणून जेवढी माया जमविली, तेवढी परत केली. त्यांनी समाजाकडून जेवढे मिळविले तेवढे त्यांनी समाजाला परत केले आहे. त्यांच्या सौंदर्यनिष्ठेचा आशय नैतिक आहे हे यावरूनही सूचित होते. काही मंडळी खाजगी रीतीने त्यांना घट्ट मुठीचा म्हणतात, परंतु ती झाकलेली मूठ खरोखरच सव्वा लाखाची असते व ती वेळोवेळी मोकळी करतात. समाजाकरिता, त्यातल्या त्यात विशेष म्हणजे समाजातील रंजल्यागांजल्यांकरता, आंधळ्या-पांगळ्यांकरिता. त्यांचा पात्रापात्रविवेक चोख असतो.

●



अनुक्रमणिका



लेख

डॉ. रामचंद्र देखणे

# मराठीचा विदग्ध महाकवी : गदिमा

'महाराष्ट्राचे आधुनिक वाल्मिकी' 'गदिमां'च्या साहित्यिक कर्तृत्वाचा त्यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने घेतलेला विचक्षण वेध.

सत्कवींचे काव्य दिक्कालाच्या मर्यादा ओलांडून पलीकडे जाते आणि कोणत्याही कालखंडातील रसिकांना ते आपले वाटते. कवीचे व्यक्तिमत्त्व त्याच्या काव्यात दडलेले असते. त्या व्यक्तिमत्त्वात त्याची धार्मिक, नैतिक, सांस्कृतिक मते भरून राहिलेली असतात. म्हणून संस्कृत काव्याचा ज्येष्ठ समीक्षक राजशेखर याने म्हटले आहे की,

*यत् स्वभावः कविस्तदनुरूपं काव्यम्।*

ज्या स्वभावाचा कवी, त्याला अनुरूपच त्याचे काव्य असते. असे असले तरी त्याच्या भावनात्मक प्रतिक्रिया भिन्न भिन्न असतात आणि त्या त्याच्या काव्यातून रसात्मकतेने ठायी ठायी व्यक्त होत असतात. संस्कृत साहित्यात एक वचन प्रसिद्ध आहे-

*अपारे काव्यसंसारे। कविदेव प्रजापतिः।*

ह्या अपार काव्यसृष्टीचा कवी हाच प्रजापती आहे. तो स्वतःचे काव्यविश्व निर्माण करतो. त्यात स्वतःही रमतो आणि रसिकांनाही रमवितो. कल्पनेचा विलास, नावीन्याचा किंवा नवरचनेचा उल्हास आणि अर्थाचा प्रकाश जिथे एकवटतो, तिथेच हे काव्यविश्व उभे राहते. स्वतःचे व्यापक काव्यविश्व निर्माण करणारा एक महान कवी म्हणून गदिमांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल. त्यांच्या व्यापक काव्यविश्वात भावकविता आहे, भक्तिकाव्य आहे, शाहिरीकाव्य आहे, लोककाव्य आहे, चिंतनशील कवितांचे एक भरीव दालन आहे. गदिमांच्या काव्यस्वभावाची अनुरूपता अशा वैविध्यतेने प्रकटते आहे आणि अशा भरगच्च काव्यविश्वातून ती जनमानसाशी शब्दसंवाद साधते आहे.

गीतरामायणामुळे गदिमांना महाराष्ट्राचा 'आधुनिक वाल्मिकी' म्हणून गौरविले गेले. भारतीय साहित्यसृष्टीत रामायण आणि महाभारत लिहिणारे महर्षि वाल्मिकी आणि व्यास हे महाकवी म्हणून गणले जातात, तर त्याच आर्ष महाकाव्यातील विविध व्यक्तिरेखा, प्रसंग, घटना आणि तत्त्व पुढे नेणारे विदग्ध महाकवी म्हणून कालिदास, भवभूति, भास, माघ, भार्गवी, श्रीहर्ष या महाकवींचा उल्लेख करावा लागेल. ह्या महाकवींनी संस्कृत काव्यविश्वाला आपली प्रतिभा आणि व्युत्पत्तीने सौंदर्यरूप दिले. संतश्रेष्ठ ज्ञानदेव आणि तुकोबाराय आदी संतकवींना मराठीतील आर्ष महाकवी म्हणून संबोधले जाते तर मराठीतील विदग्ध महाकवी म्हणून अभिमानाने गौरवावे लागेल ते गदिमांना. त्यांनीही आपल्या



प्रतिभेला व्युत्पत्तीची आणि व्यासंगाची जोड देत मराठीतील विदग्ध महाकाव्याची परंपरा समृद्ध केली. ज्ञानोबा-तुकोबांच्या अभंगवाणीचा प्रासादिक मोगरा त्यांच्या काव्यात दरवळतो आहे. तुकोबारायांच्या वाणीतील परखडपणा आणि अंतर्मुख वृत्तीच्या खुणाही त्यात डोकावत आहेत. नामदेवांची आर्तता त्यात प्रगटत आहे. समर्थ रामदास आणि संत एकनाथांच्या बहुरूढ रूपकांचे अनुभवविश्वही त्यात सामावले आहे. त्यांच्या भक्तिरसप्रधान प्रासादिक काव्यरचनेबरोबरच शाहिरी काव्यातील चैतन्याची थाप प्रत्येक शब्दाशब्दांतून प्रतीत होते आहे, तर शाहीर रामजोशींच्या वळणावरची त्यांची लावणी शब्दलालित्याने रसिकांना मोहिनी घालत आहे. भावकवितेच्या अंगाने तरल मनाच्या उत्कट भावदर्शनाचा गाभाराही दरवळून निघाला आहे. तर 'गीतरामायण' आणि 'गीत गोविंदा'सारख्या मराठीतील आख्यान काव्याने मराठीतील महाकाव्याचे एक समृद्ध दालनच उभे राहिले आहे. म्हणूनच 'मराठीतील विदग्ध महाकवी' हीच त्यांची खरी ओळख आहे. गद्य आणि पद्य या दोन्हीही भक्कम तीरांमधून त्यांच्या साहित्यप्रतिभेचा प्रवाह अखंडपणे वाहतो आहे. ते भावकवी आहेत. चित्रपटातील असंख्य गीतांचे गीतकार आहेत. शाहिर आहेत आणि शब्दकळेला हळुवार शृंगारात नेणारे लावणीकारही आहेत. प्रतिभेची एवढी विविधता कवींच्या ठायी क्वचितच आढळेल. मराठी चित्रपटांसाठी त्यांनी १५७ पटकथा आणि २०००पेक्षा जास्त गाणी लिहिली. त्यांच्या गाजलेल्या चित्रपटांमध्ये 'रामजोशी', 'वंदे मातरम्', 'पुढचे पाऊल', 'गुळाचा गणपती', 'लाखाची गोष्ट', 'पेडगावचे शहाणे', 'जगाच्या पाठीवर', 'देवबाप्पा' यांसारख्या उत्तम चित्रपटांचा समावेश आहे. चित्रपटांच्या पटकथेलाही केवळ संवादात्मक नव्हे तर साहित्यिक उंचीवर नेणारे ते पटकथाकार होते. हिंदीमध्येही 'नवरंग', 'दो आँखे बारह हाथ', 'गूंज उठी शहनाई' यांसारखे गाजलेले चित्रपट त्यांचेच. हिंदीभाषेतील २५ चित्रपटांच्या पटकथा त्यांनी लिहिल्या आणि हिंदीतील सारेच चित्रपट त्यांच्या कथेमुळे खूप गाजले, ही वस्तुस्थिती आहे. त्यांची चित्रपट गीते तर इतकी गाजली आहेत की, प्रत्येक गीत केवळ गेयतेमुळे 'गीत' या संकल्पनेत जाऊन बसते, पण शब्द आणि आशयाच्या भूमिकेतून ते गीतही काव्याच्या पातळीवर जाते. त्यांचे गीतही काव्यच असते. उदाहरण द्यायचे झाले तर 'सबकुछ पुल' म्हणून गौरविलेल्या गुळाचा गणपती चित्रपटात

*'इंद्रायणी काठी देवाची आळंदी*
*लागली समाधी ज्ञानेशाची।'*

हा अभंग ऐकताना अनेकांनी संतांच्या गाथेची पाने धुंडाळली. पण तिथे कुठेच तो अभंग आढळला नाही. पुढे पारंपरिक अभंग म्हणून लोकप्रिय झाला. पण या अभंगाचा रचियेता गदिमा आहे हे कित्येकांना माहीत नव्हते. हा अभंग गायन शैलीतून रसिकमान्य करणारे पं. भीमसेन जोशी यांनाही हे प्रथम माहीत नव्हते. पंडित भीमसेन जोशी म्हणजे अण्णासुद्धा संतांच्या प्रासादिक अभंगांप्रमाणेच तो गात होते. काव्यातही प्रासादिकता काय असते, याचे हे उत्तम उदाहरण म्हणावे लागेल. असाच प्रतिभेच्या प्रासादिकतेचा आणखी एक प्रसंग प्रभातच्या 'संत तुकाराम' चित्रपटातील 'आधि बीज एकले' या अभंगातून उभा राहतो. त्या अभंगातील शब्दरचना, त्याची प्रासादिक चाल आणि ज्या पद्धतीने तो गायला गेला, तो गायनाचा आविष्कार पाहता संतसाहित्याच्या अनेक अभ्यासकांनीही तुकोबारायांच्या गाथेत हा अभंग कुठे आहे, म्हणून गाथा चाळली. अभंग सापडेना आणि मग कळले की, ही शांताराम आठवले यांची रचना आहे. आपल्या काव्याला एवढ्या उंचीवर नेण्याचे भाग्य फार थोड्या साहित्यिकांना लाभले. एवढ्या प्रासादिकतेने अभंगरचना करणारे गदिमा-

*'माझ्यासाठी दिली राहुटी*
*इतरांना मज्जाव।*
*तुम्ही माझे बाजीराव।।'*

यासारख्या रामजोशी वळणाच्या लावण्याही तितक्याच सहजपणे लिहितात. 'जगाच्या पाठीवर'मधील-

*'नाच नाचूनि अति मी दमले*
*थकले रे नंदलाला'*

यांसारख्या गीतांतून गवळणीची आर्तताही तितक्याच सहजपणे मांडतात. कवितेच्या कोणत्याही प्रांतातील त्यांचे सहजपणे डोकावणे हेच त्यांच्या काव्यातल्या स्वाभाविकतेचे सहजसुंदर दर्शन आहे.

गदिमांचा वाङ्मयीन स्पर्श मला शालेय जीवनापासून झाला. त्यांच्या अनेक कविता पाठ्यपुस्तकात समाविष्ट होत्या. मराठीचे शिक्षक त्या कविता गाऊन दाखवायचे आणि कविता गाऊनच शिकविली जायची. त्यामुळे गदिमांच्या अनेक कविता पाठ झाल्या. त्यांच्या एका पुस्तकावरून घेतलेला 'औंधाचा राजा' हा धडा शिकविताना आमच्या मराठीच्या बाईंनी आठ दिवस संपूर्ण गदिमा सांगितले आणि मग तो धडा शिकवला. त्यामुळे त्यांच्या मुखातून ऐकलेले गदिमा आजही मनात आणि कानात घर करून राहिले आहेत. मी जेव्हा पुण्यात महाविद्यालयीन शिक्षणासाठी आलो, तेव्हा मला गदिमांना भेटण्याची खूप इच्छा झाली आणि तसा एक प्रसंगही घडला. कवी जगदीश खेबूडकरांच्या एका लोकगीतांच्या कार्यक्रमाचा शंभरावा प्रयोग पुण्यात संपन्न झाला. त्या वेळी



अनुक्रमणिका

प्रमुख पाहुणे म्हणून गदिमा उपस्थित होते. जगदीश खेबूडकर हे उत्तम कवी आणि गीतकार. त्यांच्या गीतांनीही चित्रपटसृष्टी गाजवलेली. ते गदिमांना गुरुस्थानी मानत. सारस्वतातील गुरु-शिष्यांचा एक अपूर्व संगम मला त्या वेळी अनुभवायला मिळाला. स्वतःचे सारे मोठेपण विसरून गदिमा हे खेबूडकरांचे मोठेपण सांगत होते. मला ज्ञानदेवांच्या ओवींची आठवण झाली-

*'अगा थोरपण पऱ्हा सांडिजे।*
*व्युत्पत्ती आघवी विसरीजे।'*

आपले थोरपण सोडावे, व्युत्पत्ती विसरावी आणि गुणांचे कौतुक करावे हेच मोठेपणाचे लक्षण ठरते. त्यांच्या त्या विनम्रतेमध्येच त्यांच्या मोठेपणाची साक्ष दडली होती.

गदिमांचे मराठी भाषेतील आणि महाराष्ट्री संस्कृतीतील मोठे वाङ्मयीन योगदान म्हणजे 'गीतरामायण'. गीतरामायणाने गदिमांना अजरामर कीर्ती मिळवून दिली आणि ती कथा महाराष्ट्र सारस्वतातील रामकथेचा आत्मा ठरली. गीतरामायण गात गातच जन्माला आले. गात गातच वाढले आणि गातं गातच परिणामाला आले. कविश्रेष्ठ बा. भ. बोरकरांनी म्हटले आहे, की ''माडगुळकरांनी वाल्मिकीच्या काव्यसृष्टीतले वेचीव सौंदर्य आपल्या स्वयंभू प्रतिभेने बिनचूकपणे निवडले आहे आणि अवघ्या छपत्र गीतांत आपली सजीव आणि चलित चित्रकथा तुमच्या-आमच्यासमोर मूर्तिमंत रूपात उभी केली आहे. कापसातून धागा निघावा तितक्या सहजतेने त्यांच्या रचनेतून अर्थाचा धागा निघे आणि त्या धाग्यानेच गीतरामायणाचे शालीन वस्त्र विणले जाई. गीतरामायण हे शब्दाने आणि अर्थाने जेवढे समर्थ आहे, तेवढेच त्याच्यावरील संगीताच्या साजानेही. गदिमांनी गीतरामायणातील गीते लिहावीत आणि त्यावर सुधीर फडके यांनी सहजसुंदर चाली बांधाव्यात आणि मग गीतरामायणरूपी प्राकृत श्रुतीतून श्रवणसुखाची पर्वणी उभी राहावी. हा अनुभव मराठी मुलखाने घेतला आहे.'' जेवढी प्रतिभा गीतलेखनाला लागते तेवढीच स्वरसंगीतालाही. कवी आणि संगीतकार दोघेही एकाअर्थी सरस्वतीचे पुत्र. गदिमांच्या गीतरामायणाला ऐकताना खरोखरीच प्रत्यक्ष सरस्वतीच हातात वीणा घेऊन जणू गीतरामायणात प्रकटत होती. वीणा चार तारांचा असतो. पहिल्या तीन तारा ह्या स्वाभाविक स्वरांच्या, तर चौथी तार ही 'खर्ज' स्वराची. सरस्वतीच्या वीणेच्या स्वाभाविक स्वरांच्या तीन तारा ह्या बाबूजींच्या म्हणजे सुधीर फडक्यांच्या रूपात संगीताच्या अंगाने होत्या, तर चौथ्या खर्ज स्वराची तार गीतांचे शब्द घेऊन गदिमा झाली होती. रसिक मात्र त्या स्वरशब्दांच्या वीणावादनाने मुग्ध झाले होते. पु.ल. देशपांडे यांनी एके ठिकाणी म्हटले आहे, की ''गदिमा लिहायला लागले की

**“ कविश्रेष्ठ बा. भ. बोरकरांनी म्हटले आहे, की 'माडगुळकरांनी वाल्मिकीच्या काव्यमृष्टीतले वेचीव सौंदर्य आपल्या स्वयंभू प्रतिभेने बिनचूकपणे निवडले आहे आणि अवघ्या छपत्र गीतांत आपली सजीव आणि चलित चित्रकथा तुमच्या-आमच्यासमोर मूर्तिमंत रूपात उभी केली आहे.... गदिमांनी गीतरामायणातील गीते लिहावीत आणि त्यावर सुधीर फडके यांनी सहजसुंदर चाली बांधाव्यात आणि मग गीतरामायणरूपी प्राकृत श्रुतीतून श्रवणसुखाची पर्वणी उभी राहावी. हा अनुभव मराठी मुलखाने घेतला आहे. ”**

कुठून तरी अदृश्य वाल्मिकी त्यांच्या लेखणीत येतो आणि गजानन ते उतरीत जातो. हा कवी गाणे लिहीत नाही. गाणे बोलतो.'' पुढे तर अतिशय अभिमानाने पु.ल. सांगतात, ''एकनाथांप्रमाणे माडगुळकर हा सर्व पेठांचा कवी आहे. आईने दुधाबरोबर ओवी पाजून वाढविलेला हा कवी आहे.''

प्राचीन संस्कृत पंचमहाकाव्यात श्रीहर्षाचे 'नैषधीय चरित' हे महाकाव्य गणले जाते. महाभारताच्या वनपर्वातील नल-दमयंतीच्या उपआख्यानावरून श्रीहर्षाने हे महाकाव्य इ. स. ११९३ ते ११९५ च्या कालावधीत लिहिले आहे. नल-दमयंतीच्या प्रेमाची सुंदर कथा या काव्यात श्रीहर्षाने मांडली आहे. नल-दमयंती ह्या दोन्ही व्यक्तिरेखा वाङ्मयीन, ऐतिहासिक तसेच उदात्त मानवी तेजस्वीतेचे प्रतीक म्हणून या काव्यात उभ्या राहतात. नल हा निषध देशाचा अत्यंत पराक्रमी, देखणा आणि पुण्यश्लोक राजा. दमयंतीला त्याने पाहिलेले नसते, पण तिच्या रूप आणि गुणांच्या श्रवणानेच तो दमयंतीवर अनुरक्त होतो. तिच्या विचाराने तो अस्वस्थ होतो आणि नगराच्या एका उद्यानात तिचाच विचार करीत हिंडत असतो. हिंडताना त्या उद्यानातील एक विस्तीर्ण सरोवरात काही जलपक्षी विहार करीत असतात. त्यात एक सोनेरी राजहंस त्याला दिसतो-तो राजहंस अतिशय दमलेला आणि मलूल झालेला असतो. नल त्या राजहंसाला पकडतो. त्या वेळी तो राहजंस सांगतो, ''राजा, मला पकडू नकोस. माझी परिस्थिती लक्षात घे. घरी माझी वृद्ध आई आहे. माझी पत्नी नुकतीच प्रसूत झाली आहे. दोघींनाही मीच आधार आहे.'' ह्या नल-दमयंती आख्यानाचे रघुनाथ पंडितांनी केलेले वर्णन-

*'म्हातारी उडता नयेचि तिजला माता मदिया अशी...*
*हातामाजी नृपा तुझ्या गवसलो आता करावे कसे---'*

हे काव्य मागच्या पिढीपर्यंत अनेकांच्या ओठांवर होते. तो सुवर्ण राजहंस पुढे म्हणतो, ''मला मारलेस तर त्यांची

अवस्था काय होईल? माझी पिले माझा ध्यास घेऊन प्राण सोडतील.... तू मला सोड...''

नलालाही ह्या मनुष्यवाणीने बोललेल्या सुवर्णहंसाचे आश्चर्य वाटले. तो त्याला सोडून देतो आणि तोच राजहंस नल-दमयंतीच्या प्रेमसंदेशाचे एकमेकांकडे वहन करतो. श्रीहर्षाने ही कथा महाकाव्यातून अद्‌भुत प्रेमकथेने रंगविली आहे. पण श्रीहर्षाने मुक्त केलेला तो राजहंस साहित्यसृष्टीत पुढे कधीही दिसला नाही. तो उपेक्षितच राहिला. तो स्वतःचे राजहंसपण विसरला. स्वतःचे गुण आणि सौंदर्यही विसरला. तोच राजहंस जवळ जवळ एक हजार वर्षाने पुन्हा गदिमांना गवसला, तोही एका बदकाच्या पिलांच्या बरोबर विहार करताना आणि सहज शब्द बाहेर पडले-

*एका तळ्यात होती बदके पिले सुरेख।*
*होते कुरूप वेडे पिल्लू तयात एक...*
*एके दिनी परंतु पिल्लास त्या कळाले।*
*भय वेड पार त्याचे वाऱ्यासवे पळाले।*
*पाण्यात पोहताना चोरूनिया क्षणैक*
*त्याचेच त्या कळाले तो राजहंस एक।*

श्रीहर्षाचा नल-दमयंतीतील सुवर्णहंस गदिमांच्या राजहंसाच्या रूपाने पुन्हा सारस्वताला गवसला. महाकाव्यातील रूपकांचे अनुबंध काही गमतीशीर असतात. ह्या राजहंसाच्या स्थितीमध्ये एक मोठे रूपक गदिमांना सांगायचे आहे. आजही समाजात असे गुणवान, कर्तृत्ववान, देखणे राजहंस आहेत, पण आपल्या गुणसौंदर्याला विसरून त्यालाच कुरूपता-कुरूपता म्हणून कवटाळत आहेत. अशा राजहंस वृत्तीच्या व्यक्तींमधील आत्मनिर्भरता हरवली आहे. त्यांच्या देखणेपणाचा केवळ समाजाला नाही, तर त्यांना स्वतःलाही विसर पडला आहे. त्यांचे गुण आणि देखणेपण समाजापुढे येऊन त्यांना राजहंस म्हणून प्रतिष्ठा मिळणे हीच सामाजिक मूल्यांच्या संदर्भातील एक आदर्शदायी घटना ठरेल. गदिमांसारख्या महाकवीचे द्रष्टेपण अशा रूपकांमध्ये दडलेले आहे. ते महाराष्ट्राचे आधुनिक वाल्मिकी आहेत. गीत गोविंदकार जयदेवांच्या कुळातील विनम्र पताकाधारी वारसदार आहेत. त्याचबरोबर द्रष्टेपणाने प्रतिभा, व्युत्पत्ती आणि शब्दसौंदर्याने मराठी सारस्वतातल्या काव्याचे दालन समृद्ध करणारे मराठीचे विदग्ध महाकवी आहेत.

●

डॉ. रामचंद्र देखणे
सी ३/४, डीएसके चिंतामणी,
५१३, शनिवार पेठ,
पुणे ३०.
दूरध्वनी : ०२०-२४४६७८९९

---





अनुक्रमणिका





लेख

अंबरीश मिश्र

# फडक्यांचे 'सुरीले' शब्द



**ख्यातकीर्त साहित्यिक ना. सी. फडके यांच्या १२५व्या जयंती वर्षानिमित्त त्यांच्या भारतीय अभिजात संगीताच्या प्रेमाबाबत आणि लेखनाबाबत एका अनोख्या दृष्टीने लिहिलेला लेख.**





ना. सी. फडके यांच्या एकशेपंचविसाव्या जयंतीनिमित्त आपल्या वडिलांच्या इतर लेखनाचा (कथा-कादंबरी हे वाङ्मयप्रकार वगळून) आढावा घ्यावा, असं त्यांच्या कन्या गीतांजली जोशी यांनी ठरवलं हे चांगलंच झालं. यामुळे आजच्या वाचकांसमोर फडके पुन्हा उभे राहतील.

क्रिकेट नि अभिजात भारतीय संगीत या विषयांवर फडक्यांनी वेळोवेळी लिहिलंय. क्रिकेट हा माझा विषय नाही. (हल्ली हा विषय खुद्द क्रिकेटरमंडळींच्याही ताब्यात राहिलेला नाहीये, पण ते असो.) तर अभिजात संगीतावर फडक्यांनी जे लिहिलंय त्यावर मी लिहितोय. आज मला ते लेखन कसं वाटतंय; शिवाय, फडक्यांची शैली, अभिजात संगीताबद्दलची, गायक-वादकांविषयीची त्यांची निरीक्षणं, आस्था या मुद्द्यांचा मी थोडक्यात परामर्श घेणार आहे.

एक गोष्ट आधी सांगून टाकतो की फडके (आणि त्यांच्या पाठीला पाठ लावून आल्यासारखे वि. स. खांडेकर) हे माझे खास आवडीचे लेखक नव्हते. एक तर ते माझ्या पिढीचे नाहीत. त्या दोघांचा काळ फार अगोदरचा. प्रामुख्यानं दोन महायुद्धांच्या दरम्यानचा. दुसरं, फडके-खांडेकरांचं लेखन मला सेंटिमेंटल आणि भाबडं वाटलं, शाळा-कॉलेजात असताना हे दोन्ही लेखक मी बऱ्यापैकी वाचले. परंतु पुढे पुढे मी त्यांना कंटाळलो. काळजाचे काप काढणारं, जगण्याची समजूत समृद्ध करणारं कणखर, टोकदार असं लेखन मला हवं होतं. फडके-खांडेकरांच्या दारात ताटकळत राहण्यात काही अर्थ नाही, हे माझ्या लक्षात आलं. तोवर माझा बी. ए. चा अभ्यास सुरू झाला होता आणि इंग्रजी हा माझा मुख्य विषय होता.

हे खरं की फडके-खांडेकरांचं लेखन त्या काळातल्या वाचकांना मनापासून आवडलं, वाचकांची मानसिक गरज दोन्ही लेखक पूर्ण करत होते हे म्हणणं म्हणजे त्या दोघांना संशयाचा फायदा देणं असं होईल. मूळ मुद्दा हा की, काळावर मात करणारं लेखन ही फार दुर्मीळ गोष्ट आहे. एखादा ज्ञानेश्वर किंवा एखादा तुकारामच ते करू जाणे. किंवा एखादा दोस्तोएवस्की. आपण या पंक्तीतले नाही हे फडके-खांडेकरांच्या लक्षात आलं होतं काय? काळाला पुरून उरणं कठीण आहे. तेव्हा आपल्या काळाला नि वाचकांना आंजारत-गोंजारत लिहू असा दोघांचा विचार होता काय? अर्थात आपापसात तसं न ठरवता.

आज, इतक्या वर्षांनंतर असं वाटतं की, फडके-खांडेकर समाजाशी फटकून वागले असते आणि समाजाची गरज पुरवण्याच्या भानगडीत पडले नसते, तर ते स्वतःत खोल उतरत गेले असते आणि तटस्थ, सावध जगले असते. आणि Cast a cold eye / on life and death / Horseman... pass by अशी, अस्तित्ववेदनेच्या ठणक्यानं उजळून निघालेली एक तरी ओळ माझ्या वाङ्मयात



अनुक्रमणिका




पडली असती. असो.

आता फडके-खांडेकरांची दुसरी बाजू. दोघांनी विपुल लेखन केलं अन् मातीची ओल जपली. पुढच्या लेखकांसाठी रस्ता प्रशस्त केला. फडके-खांडेकरांमुळे वाचन-प्रकाशन नि ग्रंथप्रसार संस्कृतीला बहर आला. एखादा लेखक (इथं तर दोन लेखक) एकाच वेळी असंख्य वाचकांचा मानबिंदू ठरतो ही मला मोठी गोष्ट वाटते. दोघांना अमाप लोकप्रियता, मानसन्मान लाभले. मुख्य म्हणजे कादंबरी या वाङ्मयप्रकारावर दोघांची नजर खिळून राहिलेली.

दुसरं म्हणजे खांडेकरांच्या आदर्शवादामुळे सतत वाद-तंटे घालणाऱ्या मराठी माणसाला करुणा, प्रेम या शाश्वत मूल्यांची गोडी लागली, तर फडक्यांच्या कादंबऱ्यांमुळे सेन्स्युअस, शरीर, ऐहिक सुखाची सत्ता काय असते ते समजलं. एका अर्थी खांडेकर-फडके परस्परांना पूरक ठरले. एक झाड, दोन पक्षी. पुढच्या काळात पु.ल. देशपांडे आणि विजय तेंडुलकर हे असेच एकमेकांना पूरक ठरले.

आता फडक्यांच्या संगीतविषयक लेखनाबद्दल. मला त्यांचं हे लेखन आवडलं. अभिजात शास्त्रोक्त संगीताबद्दल (मुख्यतः उत्तर हिंदुस्थानी संगीताबद्दल) त्यांनी आस्थेनं लिहिलंय हे तर खरंच, परंतु या विषयावर त्यांचा अधिकार आहे हेही त्यांचे लेख वाचून लक्षात येतं. सालं १९२७ पासून फडके शास्त्रोक्त संगीतावर लिहू लागले. 'प्रतिभा', 'रत्नाकर', 'मनोहर', 'लोकसत्ता', 'अंजलि' अशा नियतकालिकांतून त्यांचं लेखन नियमितपणे प्रसिद्ध होऊ लागलं. पुढे, 'नादलुब्धाच्या आठवणी' आणि 'मुजरे' या दोन पुस्तकांत हे सगळे लेख समाविष्ट करण्यात आले.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस उत्तर हिंदुस्थानातल्या अनेक गायक-तंतकार मंडळींनी महाराष्ट्रात आसरा घेतला. त्यामुळे महाराष्ट्र हे अनेक संगीतपरंपरांचं नि घराण्यांचं केंद्र झालं. ब्रिटिशांनी भारतीय संगीताकडे ढुंकूनही पाहिलं नाही. कारण ते व्हिक्टोरियन मूल्यं मानत. नीति-अनीती, पाप-पुण्याच्या ब्रिटिशांच्या कल्पना चमत्कारिक होत्या. यात ऊठसूट गाणं-बजावणं बसत नव्हतं. म्हणूनच मुसलमान किंवा हिंदू राजे-महाराज संगीतात इतके कसे रमतात, याचं ब्रिटिश अंमलदारांना आश्चर्य वाटायचं.

दुसरं, भारतात गाण्या-बजावण्याला पुन्हा बरकत यावी हे काही ब्रिटिश सरकारचं मुख्य धोरण नव्हतं. त्यांना इथं राज्य करायचं होतं, साम्राज्यविस्तार करायचा होता नि आपला व्यापार वाढवायचा होता. मुघलांचा काळ संपल्यावर उत्तरेतल्या गायक-वादकांनी छोट्या-मोठ्या रियासतींची, दरबाराची वाट धरली. यामुळे एक अपूर्व असं स्थलांतर घडलं आणि त्याचा फार मोठा लाभ महाराष्ट्राला झाला. या स्थलांतरणामुळेच उस्ताद अल्लादियाखाँसाहेब, उस्ताद अब्दुल करीम, उस्ताद रहमत अलीखाँसाहेब यांसारखे थोर कलावंत महाराष्ट्रात आले. या सांस्कृतिक स्थलांतरणाचा आपल्याकडे फारसा विचार झाला नाही. फडक्यांच्या संगीतविषयक लेखनाला असा एक व्यापक सांस्कृतिक संदर्भ आहे.

खरं तर फडके हे विलक्षण शिस्तीचे नि काटेकोर. वृत्ती व्रतस्थ शिक्षकाची. अगदी आदर्श म्हणावेत असे शिक्षक. असा माणूस सहसा संगीताचं वाकडं वळण घेत नाही. ते फडक्यांनी घेतलं. अन् त्याचा फायदा मराठी वाचकांना झाला. फडक्यांच्या संगीतविषयक लेखनाची मराठी मनाला भुरळ पडली.

फडके पेटी शिकले. तेही उस्ताद अब्दुल करीमखाँसाहेबांच्या पुण्यातल्या नूतन विद्यालयात. ही १९१४ सालची गोष्ट. खुद्द खाँसाहेब फडक्यांना हार्मोनियम शिकवायचे. गावात एखाद्या साथीच्या रोगाचा प्रादुर्भाव व्हावा तसा पेटीवादनाचा कहर पुण्यात आणि अन्य शहरांत तेव्हा माजला होता. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरांचं 'मानापमान' तेव्हा गाजत होतं. या नाटकातल्या बऱ्याचशा चाली गोविंदराव टेंबे यांनी दिल्या होत्या. त्यांनी तयार केलेल्या पदांची नोटेशन्स 'मानापमान' नाटकाच्या पुस्तकात छापण्याचा उपक्रम नाटककारानं सुरू केला होता. यामुळे घरोघरी मानापमान नाटकातली पदं पेटीवर वाजवली जात. फडक्यांनी त्या दिवसांचं मार्मिक वर्णन केलंय. एका लेखात ते म्हणतात :

''हार्मोनियमचे कितीतरी क्लासेस शहरात होते. रस्त्यानं जाणाऱ्या माणसाला आजूबाजूच्या घरांतून किंवा क्लासच्या जागेतून 'मानापमान' नाटकातल्या लोकप्रिय पदांचे हार्मोनियममधून निघालेले स्वर ऐकू यावे हा एक नित्याचा अनुभव होऊन बसला होता. संगीताकडे वळणारा माणूस बहुधा पेटी शिकू लागत असे. मुलगी पाहावयास येणारी मंडळी मुलीला विचारीत असत, 'पेटी वाजवता येते का?' मुलगी लाजत मुरकत देशी बनावटीची छोटीशी पेटी पुढे ओढून घेत असे. 'मला मदन भासे' हे पद तिनं वाजवलं की तिला पाहावयास आलेला मुलगा आपल्याला अनुलक्षूनच हे पद वाजवलं जात आहे, अशा कल्पनेनं खूश होत असे.''

फडके फक्त संगीताच्या जडभारी व्याकरणावर लिहीत नव्हते; तर अभिजात संगीताचं समाजशास्त्रही वाचकांना सोप्या पद्धतीनं समजावून सांगत होते. ही मोठी गोष्ट आहे.

फडक्यांनी गाणं-बजावणं पुष्कळ ऐकलं. संगीताच्या प्रांताची मनापासून मुशाफिरी केली. कोठ्यावर जाऊन

**“ संगीताचा आनंद ज्याला खरोखर घ्यावयाचा असेल त्या माणसानं आपला सामाजिक दर्जा आणि प्रतिष्ठा यांची परीटघडी जपण्याचा प्रयत्न करू नये. संगीताचा षौकही करायचा आणि लोकापवादाचे शिंतोडेही चुकवायचे या दोन्ही गोष्टी साधण्यासारख्या नाहीत. अमक्या ठिकाणी कसा जाऊ, अमक्या लोकांत कसा मिसळू, असे विचार करणाऱ्या माणसाला संगीताच्या आनंदाला फार मोठ्या प्रमाणात मुकावं लागेल. मला स्वतःला संगीताचा नाद लागल्यापासून ही गोष्ट मी ओळखली होती. माझी संगीताची गोडी पूर्ण करण्यासाठी लोकविरुद्ध आचरण करायला मी कधीच मागंपुढं पाहिलं नाही. सामाजिक प्रतिष्ठेच्या आणि सोवळेपणाच्या दृष्टीनं सर्वस्वी निषिद्ध अशा ठिकाणी आणि बहिष्कृत अशा लोकांकडे मी खुशाल गेलो, म्हणूनच मी गाण्याबजावण्याच्या सर्व तऱ्हा ऐकू शकलो... ”**

तवायफांचं गाणं ऐकलं त्याचप्रमाणे सभ्य, सुसंस्कृत रसिकांच्या दीवान-ए-खास मैफलीतही ते शरीक झाले. ते सगळं त्यांच्या लेखनात झिरपलं. त्या काळातल्या अनेक दिग्गजांच्या जलशांना ते न चुकता हजर असत. संगीताचा प्रांत म्हणजे मायाबाजार. चंगी-चरसी कलंदरांची दुनिया. फडके या दुनियेत रमले. 'नादलुब्धाच्या आठवणी' या पुस्तकातल्या एका लेखात त्यांनी दर्दी रसिकाला एक इशारा दिलाय. ते म्हणतात :

"संगीताचा आनंद ज्याला खरोखर घ्यावयाचा असेल त्या माणसानं आपला सामाजिक दर्जा आणि प्रतिष्ठा यांची परीटघडी जपण्याचा प्रयत्न करू नये. संगीताचा षौकही करायचा आणि लोकापवादाचे शिंतोडेही चुकवायचे या दोन्ही गोष्टी साधण्यासारख्या नाहीत. अमक्या ठिकाणी कसा जाऊ, अमक्या लोकांत कसा मिसळू, असे विचार करणाऱ्या माणसाला संगीताच्या आनंदाला फार मोठ्या प्रमाणात मुकावं लागेल. मला स्वतःला संगीताचा नाद लागल्यापासून ही गोष्ट मी ओळखली होती. माझी संगीताची गोडी पूर्ण करण्यासाठी लोकविरुद्ध आचरण करायला मी कधीच मागंपुढं पाहिलं नाही. सामाजिक प्रतिष्ठेच्या आणि सोवळेपणाच्या दृष्टीनं सर्वस्वी निषिद्ध अशा ठिकाणी आणि बहिष्कृत अशा लोकांकडे मी खुशाल गेलो, म्हणूनच मी गाण्याबजावण्याच्या सर्व तऱ्हा ऐकू शकलो...."

फडक्यांचं हे विधान मला फार मोलाचं वाटतं. कारण ते एका सांस्कृतिक संचिताविषयी बोलताहेत. फडके हे उच्चविद्याविभूषित; व्यासंगी प्राध्यापक नि मराठीतले एक अग्रगण्य लेखक. असा माणूस जेव्हा सभ्यतेचा बुरखा झुगारून संगीताच्या, त्या काळात बदनाम मानल्या गेलेल्या बहिष्कृत जगात प्रवेश करतो, तेव्हा ती एक मोठी सांस्कृतिक घटना असते. एक अपूर्व असं मन्वंतर शांतपणे घडत होतं आणि फडके त्या प्रक्रियेमध्ये सहभागी झाले होते आणि त्याबद्दल लिहीत होते हे आपण लक्षात घेतलं पाहिजे.

गेल्या सत्तर-ऐंशी वर्षांत उत्तर हिंदुस्थानी संगीतावर ना.सी. फडके, गोविंदराव टेंबे, बी. आर. देवधर, केशवराव भोळे, वामनराव देशपांडे, कृ. द. दीक्षित, रामकृष्ण वाक्रे, डॉ. अशोक रानडे अशा मंडळींनी भरपूर वैचारिक किंवा ललित लेखन केलंय. शास्त्रोक्त संगीताचा समग्र अभ्यास करत असताना या मंडळींचा त्या काळात अनेक प्रतिभावंतांशी, कलंदर कलावंतांशी जवळून परिचय झाला. अनेकदा परिचयाचं रूपांतर गाढ स्नेहात झालं. यामुळे दोन प्रदेश एकमेकांच्या कुशीत विसावले. मधल्या सीमा विरघळल्या.

एक प्रदेश बुद्धिनिष्ठा मानणारा; अनुभव, निरीक्षण, अनुमान, निष्कर्ष ही शास्त्रीय पद्धत मानणारा. हा प्रदेश होता देवधर-टेंबे-फडके-वाक्रे-डॉ. रानडे प्रभृतींचा, तर दुसरं जग कलावंतांचं. प्रतिभेच्या स्फोटामुळे उजळून निघालेलं अद्भुतरम्य नि बरंचसं धूसर. या दोन जगांत नित्य देवाणघेवाण सुरू होती. याला कारण ठरलं देवधर-फडके-टेंबेंचं संगीतविषयक लेखन.

एखादा कलाप्रकार जेव्हा भरभराटीस येतो तेव्हा अनेक दर्दी रसिक, व्यासंगी, विद्वान, आश्रयदाते नि प्रसारमाध्यमातले अधिकारी त्या कलाप्रकाराभोवती आस्ते आस्ते जमू लागतात. आणि कलेचं नि कलावंतांचं मोठेपण जगाला सांगतात, त्याच्या / तिच्या उणिवांची चर्चा करतात. यामुळे कलावंत-रसिक- समीक्षक- प्रसारमाध्यमं अशी ही एक सांस्कृतिक प्रक्रिया सुरू होते. फडके या प्रक्रियेतले एक महत्त्वाचे नि जबाबदार घटक होते.

फडक्यांनी लेखनाच्या ओघात काही सुंदर व्यक्तिचित्रं लिहिली आहेत. उदाहरणार्थ, पंडित भास्करबुवा बखले, गोविंदराव टेंबे, उस्ताद अल्लादियाखाँ, नृत्यांगना, मेनका नि अझुरी वगैरे. ती मुळातून वाचली पाहिजेत. फडक्यांची लेखनशैली अल्पाक्षरी, प्रसन्न आणि प्रासादिक आहे. हा लेखक मला (आणि फक्त मलाच) आपल्या मनातलं सांगतोय, असा विश्वास आजही वाचकाला वाटतो हेच फडक्यांचं यश आहे.

•



अनुक्रमणिका



समीक्षा

प्रा. विश्वनाथ शिंदे

# म्हार म्हात्म्य (महार माहात्म्य)



र म्हात्म्य ही हस्तलिखित पोथी असून तिच्यात एकूण सात अध्याय आहेत. या पोथीची ओवीसंख्या ७,०९० इतकी आहे. या पोथीमध्ये महारांपैकी सोमवंशाचा इतिहास कथन केला असून सोमवंशाचे माहात्म्य विस्ताराने सांगितले आहे. प्रस्तुत लेखात 'म्हार म्हात्म्य' या पोथीचा परिचय सांगून त्यासंबंधीचे काहीएक विवेचन करावयाचे आहे.

**पुराणपरंपरा**

भारतीय संस्कृतीत पुराणवाङ्मयाची एक अत्यंत समृद्ध परंपरा आढळते. संस्कृत भाषेतील अग्नी, भागवत, भविष्य, ब्रह्म, ब्रह्मानंद, गरुड, हरिवंश, कुर्म, लिंग, मार्कंडेय, मात्स्य, नारद, पाद्‌म्य, शिव, स्कंद, वराह, वायू आणि विष्णू अशी अठरा महापुराणे आपणांस माहिती आहेत. याशिवाय तितकीच उपपुराणे आहेत. संस्कृत भाषेत हे प्रचंड लेखन आपल्या पूर्वजांनी केलेले आहे. या लिखित परंपरेतील पुराणांपेक्षा वेगळी पण संस्कृत पुराणवाङ्मयाशी नाते सांगणारी मौखिक स्वरूपातील स्थलपुराणे आणि कुलपुराणे किंवा जातिपुराणे उपलब्ध आहेत. पण या जातिपुराणांसंबंधी मराठीत फारसा अभ्यास झालेला नसल्याने त्यांची आपणांस फारशी माहिती नाही.

सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणिच ।
वंशानुचरितं चैत्र पुराणं पंचलक्षणम् ।।

सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतर आणि वंशानुचरित अशी पुराणांची पाच लक्षणे सांगणारा मत्स्यपुराणातील श्लोक येथे मी उद्‌धृत केला आहे. उपरोक्त पाच लक्षणांपैकी जातिपुराणांमध्ये 'वंशानुचरित' या लक्षणाचा वापर केलेला दिसतो. ही जातिपुराणे पौराणिक थाटाची आहेत.

**महाराष्ट्रातील जातिपुराणे**

जातिपुराणांची परंपरा भारतातील सर्वच जाति-जमातींमध्ये अस्तित्वात असावी. आज सर्व जातींची पुराणे उपलब्ध नाहीत, ती कालौघात नष्ट झालेली असावीत. पण काही मोजक्या जातींची पुराणे आज उपलब्ध आहेत. कुणीतरी ही पुराणे त्या त्या जातींच्या श्रोत्यांपुढे गाऊन सांगतो आणि ते लोक श्रद्धेने जातिपुराणांचे श्रवण करीत असावेत. आता ही परंपरा खंडित होऊ लागली आहे. आंध्र-तेलंगणात अद्याप ह्या परंपरेचे प्रचलन आढळते. किनवट-नांदेडपासून ४०-५० कि.मी. अंतरावर एदिलाबाद या आंध्रतेलंगण प्रदेशातील शहरात श्री. रवींद्र शर्मा नावाचे गृहस्थ असून त्यांच्या कलानगरीत त्या प्रदेशातील जातिपुराणांचे गायन करणाऱ्या लोककलावंतांचे प्रतिवर्षी संमेलन भरवले जाते. स्वतः रवींद्र शर्मा या कलावंतांना जातिपुराणाच्या चित्रपट्ट्या रेखाटून देत असतात.

महाराष्ट्रातील वेगवेगळ्या जाती-जमातींपैकी कासार जातीचे 'कालिकापुराण', न्हावी जातीचे 'नाभिकपुराण', पद्‌मसाळी जातीचे 'पद्‌मपुराण' किंवा 'साळीमाहात्म्य' (श्री जिव्हेश्वर साळी माहात्म्य पुराण), डक्कलवारांचे 'बसवपुराण', धनगर जातीचे 'हालुमतपुराण', सुतार-सोनारांचे 'विश्वकर्मापुराण', कोष्टी जातीचे 'श्री देवांगपुराण', कोमटी जातीचे 'कंकपुराण' किंवा 'वैश्यपुराण' आणि महार जातीचे 'महारमाहात्म्य' अशी पुराणे उपलब्ध आहेत. इतरही काही जातींची पुराणे उपलब्ध असू शकतील.

**पूर्वाभ्यासाचे स्वरूप**

महाराष्ट्रात जातिपुराणांचा अभ्यास झालेला नाही, जो झाला तो अत्यल्प आहे. डॉ० प्रभाकर मांडे यांनी डक्कलवारांच्या बसवपुराणासंबंधी त्यांच्या 'गावगाड्याबाहेर' व 'मौखिक वाङ्मयाची परंपरा' या ग्रंथामध्ये विवेचन केले आहे.[१] त्यांनी बसवपुराणाची संहिता 'गावगाड्याबाहेर' या ग्रंथात छापली आहे. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी त्यांच्या अनेक ग्रंथात जातिपुराणांचा निर्देश केला आहे, मात्र या विषयावर विस्ताराने लिहिलेले नाही. या विषयाचा अभ्यास झाला पाहिजे अशी त्यांची इच्छा होती, तसा या विषयाच्या अभ्यासाचा स्थूल आराखडा तयार करून ठेवल्याचे मला आठवते.[२] डॉ. जयंत बापट या रसायनशास्त्राच्या प्राध्यापकाने ऑस्ट्रेलियातील मेलबर्ग येथील 'ला ट्रोब' विद्यापीठात गुरव समाजावर संशोधन केले असून त्यांनी गुरव जातिपुराणांचा अभ्यास केल्याचे ऐकिवात आहे.[३] मात्र मी त्यांचे संशोधन मुळातून पाहिलेले नाही. या तिन्ही अभ्यासकांच्या आधी महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांनी त्यांच्या १९३३ साली प्रकाशित झालेल्या 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' या ग्रंथात महार



**जातिपुराणात एक पुराणकथा असते. ती कथा कोणत्यातरी एका कुलाशी, वंशाशी, जातीशी निगडित असते. कथेचे विवरण करताना रूढ असणाऱ्या धारणा, परंपरांचा वापर केलेला असतो, पुराणातील कथा, उपकथा वापरलेल्या असतात. त्या कथा-उपकथांमध्ये गरजेनुसार बदल केलेला असतो. पुराणांतील पात्रांचा नावानिशी वापर केलेला असतो तर कधी नावापुरतीच ती आलेली असतात. रचनाकार स्वतःच्या कल्पना वापरून नवनिर्मितीही करीत असतो. जातिपुराणे एकाच वेळी पुराणकथा, आख्यायिका, दंतकथा असतात, इतिहासदेखील असू शकतात. कारण जातिपुराणांमध्ये जातीचा मूळ वंशज, महापुरुष किंवा कुलदैवताचे चरित्र चित्रण असते. जातीचा इतिहास, परंपरा, गोत्रकुळ यांची माहिती सांगणे हा जातिपुराण निर्मितीचा हेतू असतो.**



जातीच्या 'म्हार म्हात्म्य'[४] या जातिपुराणाचा निर्देश करून त्या संबंधी महत्त्वाचे विवेचनही केले आहे. मी स्वतः याआधी 'समाज प्रबोधन पत्रिका' आणि 'नवभारत' (वाई) या संशोधन पत्रिकांमध्ये दोन दीर्घ स्वरूपाचे लेख लिहिले आहेत.[५] याशिवाय या संदर्भात झालेले अन्य लेखन माझ्या ऐकिवात नाही.

### जातिपुराणांचे स्वरूप

आपणास ज्ञात असणाऱ्या पुराणांपेक्षा जातिपुराणांचे स्वरूप वेगळे असते. त्यांना लोकपुराण, कुलपुराण, जातिपुराण अशा संज्ञा वापरल्या जातात. ही जातिपुराणे विशिष्ट जातीपुरती मर्यादित असतात. लोकसंस्कृतीत, लोकजीवनात रूढ असणाऱ्या कथा-दंतकथांना, मिथकांना त्या त्या जातिवैशिष्ट्यांची जोड देऊन, कथा-उपकथानकांची मांडणी करून, अद्‌भुत घटनाप्रसंगांची भर घालून, लौकिक घटनांना अलौकिक स्वरूप देऊन तसेच लोकमानसातील आशा-आकांक्षांना बळकट करून जातिपुराणे सिद्ध झालेली असतात. त्या त्या जातींच्या उत्पत्तिकथा, त्या जातीचा वैभवशाली इतिहास त्यामध्ये विशद केलेला असतो.[६]

जातिपुराणात एक पुराणकथा (Myth) असते. ती कथा कोणत्यातरी एका कुलाशी, वंशाशी, जातीशी निगडित असते. कथेचे विवरण करताना रूढ असणाऱ्या धारणा, परंपरांचा वापर केलेला असतो, पुराणातील कथा, उपकथा वापरलेल्या असतात. त्या कथा-उपकथांमध्ये गरजेनुसार बदल केलेला असतो. पुराणांतील पात्रांचा नावानिशी वापर केलेला असतो तर कधी नावापुरतीच ती आलेली असतात. रचनाकार स्वतःच्या कल्पना वापरून नवनिर्मितीही करीत असतो. जातिपुराणे एकाच वेळी पुराणकथा, आख्यायिका, दंतकथा असतात, इतिहासदेखील असू शकतात. कारण जातिपुराणांमध्ये जातीचा मूळ वंशज, महापुरुष किंवा कुलदैवताचे चरित्र चित्रण असते. जातीचा इतिहास, परंपरा, गोत्रकुळ यांची माहिती सांगणे हा जातिपुराण निर्मितीचा हेतू असतो. यासंदर्भात पुलिकोंडा सुब्बाचारी यांचे विवेचन लक्षात घेता येईल. 'Each Kulapurana is basically a folk narrative in the sense that it evolves in a non-elite social group and does not belong to the body of classical literature. At the same time it is not a ordinary folklore. For the caste whose origin, identity and status is discussed in the Kulapurana, this narrative is sacred narrative or story of the caste deity'[७] सुब्बाचारी यांनी आंध्रप्रदेशातील जातिपुराणासंदर्भात केलेले हे विवेचन भारतातल्या सर्वच प्रदेशातील जातिपुराणांच्या संदर्भात तंतोतंत लागू पडणारे आहे.

पुराणे धार्मिक विषयावर असल्याने त्याभोवती पावित्र्याचे वलय असते, श्रद्धायुक्त भावनेने समाजातील लोकांनी त्यांचा स्वीकार केलेला असतो. सृष्टीच्या निर्मितीचे रहस्य उलगडून सांगणे, सृष्टीच्या उत्पत्ती, स्थिती, लय यांची मीमांसा करणे, स्थानमाहात्म्य, क्षेत्रमाहात्म्य सांगणे, देवदेवतांचे चरित्रकथन करणे आणि लोकांचे धार्मिक समाधान करणे ह्या पुराणनिर्मितीच्या प्रेरणा असतात. जातिपुराणाच्या निर्मितीमागे ह्या प्रेरणा तर असतातच शिवाय जातीची प्राचीनता पटवून देणे, जातीच्या मूळ कुलपुरुषाचे चरित्रकथन करणे, वंशाचे आणि जातीचे माहात्म्य विशद करणे अशा विविध प्रकारच्या प्रेरणा जातिपुराणाच्या निर्मितीमागे असतात.

आतापर्यंत आपण जातिपुराणाचे स्वरूप विवेचन केले. आता आपण 'महार माहात्म्य' या महार जातीच्या पुराणाच्या संदर्भात विचार करू.

### 'म्हार म्हात्म्य' पोथीची निर्मितिप्रेरणा

या आधी सांगितल्याप्रमाणे ह्या पोथीचे सात अध्याय आहेत. हस्तलिखित वळणदार अक्षरात आहे. "तिची भाषा मसालेवाईक म्हारी आहे" असे महर्षी शिंदे यांनीच म्हटले आहे. आज महार जातीची संभावना अस्पृश्य म्हणून केली जात असली तरी ही जात किंवा सोमवंश सृष्टीच्या निर्मितीइतका जुना आहे, अशी पुराणकाराची धारणा आहे. मार्कंड ऋषींच्या कृपेने सोमाजी नावाच्या मूळ पुरुषापासून या वंशाची उत्पत्ती झाली. सूर्य, चंद्र, अग्नी, वायू, आकाशादी पंचमहाभूतांची निर्मिती सोमवंशाच्या मूळ पुरुषाने केली असे प्रतिपादन पोथीत आहे. विश्वनिर्मितीत महार जातीचे मोठे योगदान असूनही कलियुगात ह्या योगदानाचा विसर पडला त्यामुळे महारांना हीन, अपवित्र, शूद्र मानून त्यांची अवहेलना केली जात आहे. त्यामुळे महारांमध्ये न्यूनगंडाची भावना निर्माण झाली. ही न्यूनगंडाची



अनुक्रमणिका

भावना नाहीशी व्हावी, समाजासमोर महार जातीचे मोठेपण मांडावे ह्या हेतूने प्रस्तुत पोथीची निर्मिती करण्यात आली असे रचनाकाराने सांगितले आहे. या पोथीच्या दुसऱ्या अध्यायामध्ये सोमवंशाचे-महारजातीचे माहात्म्य पुढील ओव्यांमधून सांगितले आहे.

आद्यन्त तुमच्या ववस्याचे म्हैमा। सेस न वर्णवी झाली सीमा।।
वेदा न कळे आगमा। सोमववष अप्रंपार।।२।।
हे म्हार म्हात्म्य कथा आगळी।
जो का धरील हृदयकमळी।।
तयाचे द्वीतभावाची होळी। करील रुषी मार्कंडी।।३।।
तरी हा मार्कंडी मूळ पुरुष। तयापासून म्हाराचा ववस।।
ऐका सज्जनहो सावकास। चित्ती विश्वास धरुनिया।।५।।
अनंत यौगापासून। कितीक राजाचे ढळले जन।।
परी म्हार जुनाट पुरातन। न ढळची कल्पांती।।६।।
देव झाले उदंड। परि हा म्हार अक्षय काळदंड।।
ह्याच्या स्वाधीन नवखंड। केले मूळीच क्रत्यांनी।।७।।

दुसऱ्या अध्यायात सोमवंशी महारांचे माहात्म्य सांगणारा कवी सहाव्या अध्यायात आजची महारांची अवस्था कशी आहे याचे वर्णन करून सांगतो.

सोमववपी जन्मला म्हार। घेतला सकल सृष्टीचा भार।।
जरी मारिती तया पैजार ।
तरी ज्वार म्हणे जी मायवाप।।१००।।
कलीयौगाचा उभा राहताच पाया।
म्हणती म्हारा तू दूर राहा रे।।
भ्रष्ट करतोसि आम्हास काय।
पायरी सोडलास निर्लज्या।।१०२।।
अठरा वर्ण जाती सकळिका।
अवघेच नष्ट झाले देखा।।
म्हणती म्हारासी सीवू नका।
कैसा म्हार झाला हलका या कलियौगी हो।।१०३।।

ही वस्तुस्थिती सांगून झाल्यावर माणूस म्हणून सारे एकसारखे आहेत यासंबंधीचे विवेचन केले आहे.

रक्त मांस अवघ्याचे येक। शरीर अवयव सारखेच देख।।
दोन कर्ण येक नासीक। आहे स्मशान सर्वासी।।१०५।।
रूप सर्वांचे समान। सारखेच पाठ पोट जाण।।
वीस अंगुळे दंत समान। आहेत सर्वांस सारखेच।। १०६।।
येक हजार बाहात्तर नाड्या। आणखी तीनशे साठ हाडे।।
सवा हात हाड रोकडे। मस्तकी असे सर्वांच्या।।१०७।।
सर्वांचा आत्मा येक। सारखेच मायवाप देख।।
संभोग सर्वांचे येक। दुध पांढरे सारखेच।।११५।।
मनुष्य जात ही येक। यासी दुजा भाव नाही देख।।
येण्याजाण्याचा रस्ता येक।
असे सारिखाच सर्वांचा।। ११७।।

अशा तऱ्हेने नाना उदाहरणे देऊन मानव येथून तेथून समान कसा आहे हे पटवून देण्याचा आटोकाट प्रयत्न केला आहे. पण माणसामाणसांमध्ये हा भेद का निर्माण झाला, हे देखील त्याने नेमकेपणाने कथन केले आहे.

यात काय उणा झाला म्हार। म्हणोनी त्यास धरीता दूर।।
या कलियौगी चांडाळ चुमक चोर।
अठरा वर्णे झाली ही।।११९।।

कलियुगात चमककचोरांनी वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था निर्माण केली. त्यामुळे महारांना ही विपरीत हीन अवस्था प्राप्त झाली असे सुस्पष्ट विचार कवीने मांडले आहेत. कवीच्यावर आध्यात्मिक वातावरणाचा प्रभाव आढळत असला तरी त्याचे विचार जुने, बुरसटलेले नाहीत, त्याच्या मांडणीत स्पष्टता आहे असे उपरोक्त ओव्यांमधील विवरण वाचून वाटते. पोथीचे आणखी तपशील ध्यानात घेण्याआधी हा कवी कोण, हे आपण पाहू.

**ग्रंथकर्ता**

ही पोथी रचणारा पुराणकर्ता प्रसिद्ध व्यक्ती नाही. त्यामुळे त्याच्याविषयी वाङ्मयाच्या इतिहासात कुठेही नोंद आढळत नाही. सातव्या अध्यायात ग्रंथकर्त्याचे नाव आहे.

पूर्वी व्यास वाल्मिकी मुनी। सुकसनकादिक आदि करूनि।।
तयाने हे म्हारम्हात्म्य रत्नखाणी।
कल्पित करोनि ठेविले।।१६।।
तयाची चतुरा ऐसी। कलियुगी अवतरला बाळकदास।।
त्यांनी ह्या म्हारम्हात्म्याचा प्रकाश।
करुनि दाखविला कलियौगी।।१७।।

'बाळकदास' या नावाच्या कवीने ह्या पोथीची रचना केली हे उपरोक्त ओव्यांमधून आपणास कळते. पण कवी त्याचे कर्तेपण स्वतःकडे घेत नाही. हा मध्ययुगीन काळातला एक संकेत होता. त्या संकेतानुसार ग्रंथाचे कर्तेपण कवी स्वतःकडे न घेता आपण केवळ निमित्तमात्र आहोत अशी भूमिका घेत असत. त्या संकेतानुसार बाळकदासाने आधीच व्यास, वाल्मिकी, सनकादिकांनी ह्या ग्रंथाची कल्पना करून ठेवली होती, आपण केवळ त्या ग्रंथास प्रकाशात आणले अशी विनयशील भूमिका घेतली आहे. मध्ययुगीन वाङ्मयात असा संकेत सार्वत्रिक होता हे जाणकारांना माहीत आहे. त्यामुळे या पोथीचा कर्ता बाळकदास नावाचा कवी आहे हे निश्चितपणे म्हणता येईल. प्रस्तुत पोथीत आणखी एका ठिकाणी सातव्या अध्यायात ग्रंथसमाप्ती करताना स्वतःबद्दल अधिकची माहिती सांगितली आहे.

पूर्वे सनिध पने पाकन। पावणे दोन योजन।।
दक्षिणेस गोदावरी पूर्ण । तीन योजने जाणवा।।८०।।
पश्चिमेस नीराबाई मध्ये। उत्तरभागी पाडेगाव आहे।।
ग्रंथकर्त्याचा अवतार पाहे। तेथे झाला जाणिजे।।८१।।

यजमानांच्या घरी जाऊन गायन करणारे लोकगायक असत, यजमानांच्या कुलपुरुषाचे चरित्र ते गाऊन दाखवत आणि यजमानासह श्रोते श्रद्धेने ते श्रवण करीत. या लोकगायकांपैकीच

एक बाळकदास असावा. या संदर्भात महर्षी वि. रा. शिंदे लिहितात, ''ह्या 'म्हार म्हात्म्य' पुराणाचे कर्ते बाळकदास हे म्हारांचे एक पुरोहित गोसावीबुवा दिसतात... नीरा नदीच्या काठी पुणे जिल्ह्यात पाडेगाव म्हणून एक गाव आहे. ते स्थळ ग्रंथाचे शेवटी दिले आहे. ह्या गावी म्हार गोसाव्यांची प्रसिद्ध घराणी आहेत. ते असले ग्रंथ करितात असे ऐकतो.''[६] इतक्या माहितीवरून पारंपरिक धाटणीची पोथी लिहिणारा जागरुक, अस्पृश्यतेच्या प्रश्नासंबंधी खोलवर विचार करणारा हा बाळकदास नेमका कोणत्या जातीचा असावा, हे कळत नाही. पोथीत त्यांनी स्वतःच्या जातीचा उल्लेख कुठेच केलेला नाही.

**पोथीची उपलब्धता**

''ह्या पुराणाची पोथी इ.स. १९०७ साली परळ येथील आमच्या रात्रीच्या शाळेतील एका भाविक महार मुलाने मला दिली'' असा निर्देश स्वतः महर्षींनी केला आहे.[७] ही पोथी मिळाल्यानंतर महर्षी शिंदे यांनी या पोथीचा उपयोग 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' हा ग्रंथ लिहिताना केला. पोथीतील ओव्या विषय प्रतिपादनात त्यांनी वापरल्या आहेत. त्यानंतर ही पोथी महर्षी शिंदे यांच्या समग्र लेखनाबरोबर प्रा.गो.मा.पवार यांच्याकडे आली. त्यांनी या पोथीच्या झेरॉक्स प्रत राजा ढाले आणि वामन होवाळ यांना दिल्या होत्या. या दोघांनीही पोथीसंबंधी काही लिहिल्याचे ऐकिवात नाही. त्यापैकीच एक प्रत मलाही उपलब्ध झाली आहे.

**पोथीचा रचनाकाळ**

या जातिपुराणाच्या सातव्या अध्यायाच्या शेवटी पुराणलेखन समाप्त झालेल्या काळाची नोंद पुढीलप्रमाणे आढळते.

शके १८८८। सर्वधारी नाम संवत्सर प्रवेशी।।
वैशाख वैद्य पंचमीस। ग्रंथ समाप्त झाला पै।।८२।।
चंद्रवार ते दिसी। सोमवंस प्रवेशी।।
प्रथम प्रहरासी। ग्रंथ समाप्त केला हो।।८३।।

महर्षी शिंदे यांनी ग्रंथाच्या काळासंबंधी मतभेद व्यक्त केला आहे. ''शके १८८८ असे चुकून पडले असावे, शके १७८८ असावे. येरवी पुढील ओवीचा प्रास जुळणार नाही. शके १८८८ पुढे यावयाचे आहे.''[८] महर्षी शिंदे यांचे म्हणणे गृहीत धरले तरी त्यात एक अडचण अशी आहे की कालगणनेचा विचार केला असता शके १७८८(इ.स. १८५७) किंवा पोथीत आलेले शक १८८८ यापैकी दोन्हीही वर्षी सर्वधारी नाम संवत्सर येत नाही आणि तिथीचा विचार करता वैशाख वद्य पंचमीला चंद्रवार म्हणजे सोमवार येत नाही. वैशाख वद्य पंचमी सोमवार असा तिथीचा विचार केला तर शके १७१० म्हणजे इ.स. १७८८ ला मात्र संवत्सराचा नसला तरी तिथी आणि वाराचा मेळ बसतो. त्यामुळे या काळातच ह्या पोथीची रचना झालेली असावी असे म्हणावयास वाव आहे. बाळकदासाने अस्पृश्यतेसंबंधी आणि महार जातीच्या यातनेसंबंधी पोथीमध्ये ज्या तळमळीने विचार मांडले आहेत, ते अभूतपूर्व आहेत असे म्हणायला हवेत.

महर्षी वि.रा.शिंदे इ.स. १९०३ मध्ये अहमदनगर जवळील 'भिंगार' या गावी अस्पृश्यांच्या सभेत भाषण करावयास गेले, तेथे पहिल्यांदा त्यांना अस्पृश्यतेच्या प्रश्नाची तीव्रता लक्षात आली. तेव्हापासून त्यांनी स्वतःला अस्पृश्योद्धाराच्या कामासाठी जुंपून घेतले. इ.स. १९०६ मध्ये त्यांनी अखिल भारतीय पातळीवरून कार्य करणाऱ्या 'भारतीय निराधार साह्यकारी मंडळी' (डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया) या संस्थेची स्थापना केली. म्हणजे महर्षींनी अस्पृश्योद्धाराचे काम हाती घेण्यापूर्वी काही वर्षे आधी बाळकदासाने हे पुराण रचले आणि त्यात त्यांनी अस्पृश्यांची व्यथा मांडली होती. हे ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचे आहे असे मला वाटते.

बाळकदास आध्यात्मिक, परंपरावादी वातावरणात वाढलेले असावेत हे पोथीच्या रचनेवरून कळते. पण पोथीमध्ये अस्पृश्यतेसंबंधी ज्या पद्धतीने विचार मांडले आहेत, प्रतिवाद केलेला आहे, त्यावरून ते आधुनिक विचाराचेही होते असे दिसते. किंबहुना अस्पृश्यांचे दुःख मांडण्यासाठी जाणीवपूर्वक आध्यात्मिक पार्श्वभूमी असणाऱ्या पोथी रचण्याची योजना केली असावी. तत्कालीन प्रेक्षकांची / श्रोत्यांची अभिरुची लक्षात घेऊन त्या परिप्रेक्ष्यात जाणीवपूर्वक ही क्लृप्ती योजिली असावी असा माझा कयास आहे. संत चोखामेळा, कर्ममेळा, सोयराबाई यांनी अभंगवाणीतून अस्पृश्यांची व्यथा मांडली पण त्याच्या कितीतरी पुढे जाऊन बाळकदासाने अस्पृश्यांच्या दुःखाचे, वेदनेचे चित्रण या पोथीत केले आहे.

**'म्हार म्हात्म्य' पोथीचे स्वरूप आणि विषयविवेचन**

मध्ययुगीन काळात साहित्य अध्यात्मप्रवण होते आणि तो प्रभाव नंतरच्या काळातील मराठी साहित्यात प्रदीर्घ काळ टिकून राहिला. या आध्यात्मिक वाङ्मयाचा संस्कार तत्कालीन समाजजीवनावर स्वाभाविकपणे झालेला होता. पुराण सांगण्याची आणि ऐकण्याची परंपरा तर यादवकाळापासून रूढ होती. पुराण ऐकण्याची मुभा समाजातील सर्व स्तरांतील लोकांना होती. अशा एका आध्यात्मिक/धार्मिक वातावरणात बाळकदासांच्या जीवनाची घडण झालेली असावी. त्यांना रामायण, महाभारत, वेदवाङ्मय, पुराणवाङ्मय, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत यांची चांगली माहिती आहे. ते बहुश्रुत तर आहेतच, त्याचबरोबर उत्तम लेखनकौशल्यही त्यांनी आत्मसात केल्याचे पोथीवरून दिसते.

**पोथीमधील नमन**

आपण एक धार्मिक आणि भक्तिपर ग्रंथ लिहीत आहोत ही जाणीव कवीला आहे त्यामुळे प्राचीन ग्रंथलेखनाचे सर्व संकेत या पोथीत त्याने मनःपूर्वक अनुसरले आहेत. त्यामुळे ग्रंथारंभी जगन्नियंता, विघ्नहर्ता गणेश, विद्यादायिनी सरस्वती, कृपावंत सद्‌गुरू आणि संतसज्जन श्रोत्यांना नमन केले आहे.

ॐ नमुजी जगदेष्या। कृपाळु गा पुरानपुरुष्या।।





अनुक्रमणिका

आनंदकंद विलाष्या। माया आतीता नमः।। २।।

तो सर्व ब्रह्मांडव्यापी आहे, सूत्रधार जगन्नियंता आहे, त्यांच्या नामाची थोरवी गाताना चारी वेद शिणले आहेत इत्यादी पद्धतीने परमेश्वराची स्तुती ग्रंथारंभी आहे.

कासी खसला पीतांबरू। चर्णी घुंगरू नाद अपारू।।
घाली भक्तासी कृपापाखरू। दयार्णवा गजानना।।१४।।

अशी अनेक तऱ्हेने गणपती स्तुती येते तर सरस्वतीनमनात तिला ब्रह्मकुमारी, हंसारूढ वागेश्वरी अशी संबोधने वापरली आहेत.

ऐकूनी बाळकाची स्तुती। वर देती झाले सरस्वती।।
म्हणे म्हार म्हात्म्य ग्रंथाते। रसभरीन मी स्वआंगे।।२६।।

सरस्वतीची कृपा झाल्यानंतर सद्गुरुनमन व श्रोतृवंदना येते.

नमनाच्या सुमारे पन्नाससाठ ओव्या आहेत. यात पूर्वसूरीचे अनुकरण आहे. ज्ञानेश्वरीचा ठसा आहे पण स्वतः कवीचा कल्पनाविलासही आहे. महर्षी शिंदे म्हणतात त्याप्रमाणे "भाषा मसालेवाईक म्हारी आहे." सातव्या अध्यायात ओवी क्रमांक ५८, ५९ मध्ये अनुक्रमे ज्ञानेश्वर व एकनाथ यांच्याबद्दल कृतज्ञताभाव व्यक्त केला आहे.

**महारांचे माहात्म्य आणि स्थितिगती**

या पोथीतील सहाव्या अध्यायात माहात्म्यवर्णन केले असून त्यांच्या स्थितिगतीचे विवरणही मांडले आहे. ब्रह्मा, विष्णू, महेश हे तिन्ही देव, पंचतत्त्व, माया, स्थूल, सूक्ष्म, महाकारण, चौदा चक्रे, बावन्न मातृका, मन, बुद्धी, अहंकार, परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी, जागृती, सुपुप्ती, उन्मनी या अवस्था यापैकी काहीच अस्तित्वात नव्हते, अशा वेळी सोहऽम् जागा झाला आणि महामुनीस त्याने विचारले, "सखया तू कोठे होतास, कोणत्या स्थानी सांग मज" तेव्हा महामुनी मार्कंडी त्यास सांगतात "तुम्ही लोद होऊन पडला होता तेव्हा मी हिरण्यरूपाने तुमच्याजवळच होतो." सोहम् म्हणजे सोमवंश म्हणजे परमेश्वर आणि मार्कंडी मुनी दोघे मिळून सृष्टीची रचना करण्याचे ठरवतात. प्रथम शून्याची निर्मिती करतात, त्यानंतर चंद्र, सूर्य, पृथ्वी, मेरूमंडल, गायत्री, चार वेद, पंचवर्ण, नाना जाती, पशुपक्षी, वनस्पती अशी सर्व सृष्टी निर्माण करतात.

तेव्हापासोनी सोमवंशाची ध्वजा। अक्षय उभे असे।।
ऐसा हा सोमववस निष्कलंक। तेव्हापासोनी ब्रह्मा विष्णू महेश।
अठरा वर्ण जाती सकळीक। उत्पन्न केली तयानी।।

पोथीची धाटणी पुराणाची आहे. त्या धाटणीरूप सोमवंशी महाराची उत्पत्ती आदिम काळात कशी झाली, याचे सविस्तर विवरण पोथीत आले आहे.

तरी हा मारकंडी मूळ पुरुष। तयापासून म्हारांचा ववस।।

मार्कंडी हा आपला मूळ पुरुष असून त्यांच्यापासून सोमवंश निर्माण झाला, अशी मांडणी ग्रंथांतरी केली आहे.

ह्या पृथ्वीचे राजेपद मी तुला देईन, सर्व जातीच्या लोकांना तुझ्या दारी आणीन असे आश्वासन देवाकडून सोम या मूळ पुरुषास मिळते. असा सोमवंश सर्वत्र कसा व्यापून राहिलेला आहे, याचे वर्णन दुसऱ्या अध्यायातील ओवी क्रमांक ३३ ते ९३ मध्ये आले आहे.

सोमववसी जन्मीला म्हार। कीर्ती तयाची आघम अपार।।
सत्वर धीर जैसा सागर। सोडी मर्यादा आपुली रे।।५८।।
म्हार हा धीरयाचा मेरू। शांती क्षमाचा सागरू
अठरा वर्ण नीर्धारू। राग करती म्हाराचा।।६१।।

असे महाराचे मोठेपण वारंवार कवीने वर्णन केले आहे. पोथीच्या तिसऱ्या अध्यायात गायत्रीची कथा येते. पाताळातून गायत्रीला पृथ्वीतलावर आणण्याचे महान कार्य सोमवंशाने केले. माझा अंत झाल्यावर तू उदरी जागा देण्यास तयार असशील तर मी तुझ्यासह पृथ्वीतलावर येईन अशी तिने अट घातली होती. अशा प्रकारे महारांनी मृतगोमांस भक्षण का सुरू केले, याचे समर्थनही केले आहे. प्रेतदहन प्रसंगी महारांना ब्राह्मणाकडून मान कसा मिळाला, याचीही कथा तिसऱ्या अध्यायात आहे.

**म्हार दरिद्री का झाला**

महार सत्त्वधीर, खरे बोलणारा, इमानी, विश्वनिर्मितीत शंकराच्या बरोबरीने सहभागी असणारा अशी सोमवंशी महाराची स्तुती पोथीमध्ये वारंवार आलेली आहे. पण पोथीच्या चौथ्या अध्यायात तो दरिद्री का झाला हे सांगताना त्याचे अनेक दोष सांगितले आहेत.

कलीयुगी महार झाला नृप। करू लागला आचार भ्रष्ट।।
तो करतो उदंड कष्ट। परि न पुरे तयासी।।१२०।।
तरी या म्हारानी। कलियोगी सोडीला सन्मार्ग।।
म्हणून झाला दरिद्री। सत्य जाणा सज्जन हो।।१२१।।

त्याची मती भ्रष्ट झाली, आचारहीन झाला, तो बेढंगी चाल चालतो, खोटेपणा करतो, भांडतो, वतनासाठी झगडतो, उष्टे खातो असे वर्णन तिसऱ्या अध्यायातील अनेक ओव्यांमध्ये आले आहे. महार स्त्रियांची निंदाही पाचव्या अध्यायात आली आहे. तिचे नरडे पोकळ आहे, जितके अन्न घरी आणले ते खाऊन फस्त करते, डोळे वटारून नवऱ्याच्या तोंडाकडे बघते, घर उकीरड्यासारखे करते असे अनेक तपशील देऊन सांगितले आहेत. अविचारी महारणीची आणि धारागिरीची कथा या अध्यायात सांगितली आहे. एका अर्थी ही आत्मनिंदा असावी असे वाटते. पण म्हारांना जो उपदेश केला आहे त्यात जानवे घाला, त्रिकाळी पूजा करा, गायत्री मंत्र जपा, ॐ नमः शिवाय मंत्र जपा असा आचारधर्म सांगितला आहे. तो एकंदर मांडणीशी विसंगत वाटावा असा आहे.

दारिद्र्याचे आणि बहिष्कृतपणाचे चटके सहन करीत जीवन कंठणाऱ्या महारांची कलियुगातील अवस्था अत्यंत दयनीय





अनुक्रमणिका

झालेली आहे याचे चित्रण पोथीत पुनःपुन्हा येते.

जरी मारती तया पैजारा। तरी ज्वार म्हणे जी मायवाप।
सोयरा होता देख। ओळख सोडली कलीयौगी।।
कलियुगाचा उभा राहताच पाया। म्हणती म्हारा दूर हो रे।।

अशी समाजाकडून हेटाळणी त्याला सहन करावी लागत आहे. सवर्ण समाज महाराला केवळ दूर लोटत नाही तर-

जिव्हा कापली आमची। बोलायास वाट नाही।।

असे महाराच्या मनातील वेदना आणि दुःख टाहो फोडून सांगितले आहे. महारांचे हृदयद्रावक आणि करुण चित्र पोथीत मांडले आहे. अन्याय सहन करणाऱ्या समाजाची अवस्था बाळकदासाने समाजासमोर व्यथित अंतःकरणाने मांडली आहे.

पुराणग्रंथाचा आकृतिबंध स्वीकारून प्रश्नाची मांडणी केली तर ही समस्या अधिक सहजपणे सर्व समाजासमोर जाईल आणि अस्पृश्यतेचा कलंक पुसला जाईल अशी आशा बाळकदासाला वाटत असावी. महर्षी शिंदे यांनी पुढच्या काळात ''अस्पृश्यता आपल्या समाजावरील कलंक आहे, तो कलंक सवर्ण समाजानेच पुढाकार घेऊन पुसून टाकायला हवा'' अशी भूमिका मांडली. हाच संदेश बाळकदासाने या पोथीतून दिला आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या समाजबांधवांना संघर्षाचा मार्ग सांगितला, विद्रोहाचे पाणी पाजून समाजमन जागृत करण्याचे कार्य केले. बाळकदासाचा हेतू तोच होता, फक्त त्याचा मार्ग वेगळा होता, दिशा भिन्न होती. त्याला काळाच्याही मर्यादा होत्या हे आपण ध्यानात घ्यायला हवे.

या पोथीमध्ये तिसऱ्या अध्यायात एक विलक्षण विचार आला आहे.

सेक सैयद मोगल पठाण। अरब रोहिले ही मुसलमान।।
रंगारी अतार बागवान। त्यांच्या पोटी जावे।।१८।।
म्हार आणि मुसलमान। हे दोघे एक वंशे उत्पन्न।।
चंद्रवंश पूर्ण। सोम म्हणताति तयालागी।।१९।।

ह्या ओव्यांचे विश्लेषण न करता मी वाचकांच्या विचारासाठी तशाच ठेवून देतो.

माझ्या संग्रही आता वेगवेगळ्या जातींची ८-१० जातिपुराणे आहेत, महार माहात्म्य वगळता ती सर्व इतर मागास जातींची आहेत. त्यात हे महार जातीचे पुराण फारच वेगळे आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे.

आता या लेखाच्या शेवटी पुराणातील एका महत्त्वाच्या घटकाचा निर्देश आवश्यक आहे. तो म्हणजे या ग्रंथाचा बाळकदासकृत ग्रंथमहिमा, फलश्रुतीचे स्वरूप लक्षात घ्यावे लागेल.

हे म्हारम्हात्म्य कथा आगळी। जो का धरील हृदयकमळी।।
तयाचे द्वीतभावाची होळी। करील रुपी मार्कंडी।।
हा म्हारम्हात्म्य ग्रंथ सुंदर। ऐकोनी उद्धारती नारीनर।।
त्यांचा निर्सल अंधःकार।
ऐसा हा म्हारम्हात्म्य दीपक जाण।।
श्रोते म्हणती दासास। म्हारम्हात्म्य ग्रंथ सरस।।
तुम्हा बोलला व्रह्मरस। ऐकोन कर्ण झाले तृप्त।।

पोथीमध्ये वेगवेगळ्या ठिकाणी असलेल्या ह्या तीन ओव्या एकत्र दिल्या आहेत. समाजमनातला द्वैतभाव संपावा, साऱ्या नारीनरांचा उद्धार व्हावा ही बाळकदासाची आकांक्षा आहे. अस्पृश्यतेचा कलंक नष्ट झाला तर बाळकदासाचे आणि आपलेही स्वप्न सत्यात उतरेल. आज जाती अधिकाधिक घट्ट होत आहेत. जात ही गोष्ट वेगवेगळ्या अर्थाने संवेदनशील झाली आहे. अशा स्थितीत जातींच्या अभ्यासाचे पुनरावलोकन करण्याची गरज निर्माण झाली आहे, म्हणून जातिपुराणांचा अभ्यास करणे मला गरजेचे वाटते.

●

संदर्भ आणि टीपा


१. प्रभाकर मांडे, गावगाड्याबाहेर, परिमल प्रकाशन, औरंगाबाद १९८३, पृ. ४५ ते ५६, परिशिष्ट पृ. ३३१
मौखिक वाङ्मयाची परंपरा, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद २०१०, पृ. ४३८
लोकगायकांची परंपरा, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद २०११, पृ. ३०३ ते ३२७
२. डॉ.रा.चिं.ढेरे यांची गुगल वरील वेबसाईट पाहण्यात आली होती. त्यातील तपशिलात जातिपुराणांसंबंधीचा आराखडा सात-आठ मुद्द्यांमध्ये त्यांनी मांडला होता.
३. २४ जानेवारी, १९९९ मध्ये श्रीक्षेत्र पंढरपूर येथे गुरव समाजाचे अधिवेशन संपन्न झाले होते. त्यानिमित्त 'बिल्वदल' (गुरवगाथा) ही स्मरणिका प्रसिद्ध झाली आहे. त्यात ही माहिती उपलब्ध झाली.
४. महर्षी वि.रा.शिंदे, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे समग्र वाङ्मय, खंड १, भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न (संपा.) गो.मा.पवार, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई २००९, पृ. १०२
५. विश्वनाथ शिंदे, अ) धनगरांचे हालुमतपुराण नवभारत (संपा.) भावे, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई, डिसेंबर, २०१० पृ. ३ ते १८
ब) जातिपुराणे आणि जातवास्तव, समाज प्रबोधन पत्रिका, (संपा.) अशोक चौसाळकर, ऑक्टो-डिसें.२०१३, पृ. २५ ते ३७
६. विश्वनाथ शिंदे, जातिपुराणे आणि जातवास्तव, तत्रैव पृ. २६
७. पुलिकोंडा सुब्बाचारी, कुलपुराणाजः ए काउंटर नॅरेटिव्ह सिस्टम, जवाहरलाल हंडू (संपा.) फोकलोर इन मॉडर्न इंडिया सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजेस मैसूर १९९८, पृ. १२५
८. महर्षी वि.रा.शिंदे, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे समग्र वाङ्मय, (संपा.) गो.मा.पवार, उनि. पृ १२२
९. तत्रैव, पृ. १०२
१०. तत्रैव, पृ. १०३



समीक्षा

डॉ. फुला बागूल

# विशुद्ध विज्ञानकवितेकडून विज्ञानस्पर्शी कवितेकडे

## ।।एक।।

ठोत्तरी वाङ्मयप्रवाहात विज्ञान साहित्याचा समावेश होत असला तरी इतर प्रवाह जसे समृद्ध होत गेले, चर्चाविषय झाले, तसे विज्ञान साहित्याचे झाले नाही. त्याची कारणे पुरेशा सखोल चिंतनांती मांडली गेली नाहीत. मुळात या प्रवाहाचा वाचक वर्ग कमी म्हणून प्रकाशन बाजारात हा माल कमीच आला. वाचक वर्गाच्या भरघोस प्रतिसादाअभावी, ग्रंथालय संचालकांच्या आस्थेअभावी, अभ्यासकांच्या संख्येअभावी देखील या प्रवाहाची उपेक्षा होते आहे. ग्रामीण साहित्याची दोनशे पुस्तके आल्यावर एखाद दुसरे विज्ञान साहित्याचे पुस्तक येते. वितरण कौशल्याच्या अभावामुळे या पुस्तकाची माहिती पोहोचत नाही. लेखक वितरणाकडे बहुधा दुर्लक्ष करतो. विद्यापीठीय चर्चासत्रात पोटतिडकीने काही मांडले जाते, पण त्याचा प्रभाव चर्चासत्रातल्या भोजनासमवेत सायंकाळी उरत नाही.

विज्ञान साहित्यातही विज्ञानकथा, विज्ञानकादंबरी, विज्ञानविषयक माहितीपर लेखनाच्या तुलनेत विज्ञान कविता हा प्रकार कमालीचा अलक्षित राहिला आहे. 'लिटमस पेपर', 'एप्सिलॉन' या डॉ. शिरीष देशपांडे यांच्या विज्ञान काव्यसंग्रहानंतर जवळपास हा प्रवाह थांबला असेच म्हणता येईल, अशी परिस्थिती आहे.

एप्सिलॉनच्या मनोगतातून व प्रस्तावनेतून विज्ञान कवितेच्या अनुषंगाने जी काही चर्चा येते ती मोलाची म्हणून प्रारंभी तिचा विचार करू या.

## ।। दोन ।।

विज्ञानकवितेकडे जाण्याचे काही मार्ग डॉ. शिरीष देशपांडे यांनी असे सांगितले आहेत.

''१. विज्ञानाच्या प्रतिमांचा वापर, २. विज्ञानावर भाष्य, ३. विज्ञानयुगाची स्तोत्रे, ४. विज्ञानाच्या समस्यांचा काव्यात्म अनुभव, ५. विज्ञानाच्या दृष्टीतून सर्व जगाचा अनुभव.''[१]

या मार्गाचे अनुसरण करणारी, प्रासादिक अशी विज्ञानस्पर्शी कविता लिहिता येईल. आज तिशीत असलेल्या कवींनी हे विज्ञानधनुष्य पेलायला हवे.

विज्ञानकवितेच्या अनुषंगाने महत्त्वाची अशी विधाने डॉ. देशपांडे यांनी केली आहेत. त्यांचा विचार जरूर करायला हवा.

१) ''विज्ञानकविता ही प्रेमकविता, दलित कविता, वैचारिक कविता, आध्यात्मिक कविता अगदी वाटेल त्या प्रकारची असू शकते. विज्ञानकविता हा कवितेचा खण, कंपार्टमेंट नाही. विज्ञान कविता ही अनुभवाची एक विशिष्ट संगती आहे: विज्ञानकविता हा कवितेचा उत्कर्ष आहे.''[२]

२) ''विज्ञान ही एक दृष्टी आहे. जगातील प्रत्येक बाब कुणाला वैज्ञानिक दृष्टीने पाहता येईलच असे नाही, पण ह्या दृष्टीतून ह्या संगतीने आपल्या प्रतिक्रियांचे काव्यात्म विश्लेषण आपल्याला करता आले तर विज्ञानकविता जन्म घेऊ शकेल.''[३]

३) ''शास्त्रीय वास्तवाची अचूक जाण आणि कवित्वशक्ती ह्या काटेकोर बाबींची विज्ञानकवितेला प्राथमिक आवश्यकता आहे.''[४]

एप्सिलॉनच्या प्रस्तावनेत दिलीप डबीर यांनी पुढील महत्त्वाची विधाने केली आहेत.

१) ''विज्ञानकविता हे खूळ नसून बदलत्या काळातील भावविश्वाची अपरिहार्यता आहे.''[५]

२) ''अतिवास्तववादी प्रवृत्ती आणि अभिव्यक्तीचे खरेखुरे निवासस्थान विज्ञान कविता हेच आहे.''[६]

३) ''एकविसाव्या शतकात विज्ञानकविता ही कवितेची सहजस्थिती होणार आहे. कारण सर्वसामान्य माणसापासून तर असामान्य कवीपर्यंत जीवनानुभवात घडून येणारे परिवर्तन विज्ञानलक्ष्यीच असणार आहे.''[७]

विज्ञानकवितेच्या शक्यता, विस्तार सुचविणारी ही विधाने मूलभूत चिंतन मांडणारी आहेत. विज्ञानकविता हीदेखील इतर कवितेप्रमाणेच संवेदनांची वाहक आहे. काळाचे अपत्य आहे. तिलाही खणात बंदिस्त व्हावयाचे नाही. तिचा आविष्कार अपरिहार्य आहे असे जरी उपरोक्त अभ्यासकांनी म्हटले असले तरी विज्ञानयुगाच्या या पहाट काली विशुद्ध विज्ञानकवितेचे लेखन वाचन थांबले आहे. ही विस्मयात टाकणारी बाब



अनुक्रमणिका








**''पृथ्वी म्हणजे खडा चिमुकला/ आकाशाच्या खुळखुळ्यातला'' या कवितेचे स्पष्टीकरण करताना अनंत देशमुख म्हणतात- ''आकाशाचा खुळखुळा ही संपूर्ण ग्रहतारकांना वापरलेली कल्पना एकदम वेगळी वाटते आणि खुळखुळा हे त्या लहान मुलाच्या (१९३५-३६च्या काळातील) विश्वाशी स्वाभाविक निगडित वाटते.''**
**अनंत अशा आकाशात पृथ्वीचे स्थान काय? या भूगोल- विज्ञानातील प्रश्नांचे उत्तर कल्पकतेने देणारे हे रंजक काव्यतुकडे होय. ''एका मिठीत घडला भलता प्रकार आहे / माझ्या मनात अजूनही विद्युत प्रभार आहे / मी मूळचेच आहे अस्थिर मूलद्रव्य / ती स्थिर राहिल्याने जडला विकार आहे'' या गझलेत विद्युत प्रभार ही भौतिकविज्ञानातील तर मूलद्रव्य ही रसायनविज्ञानातील संकल्पना विशिष्ट अशा मनःस्थितीचे, भावस्थितीचे सूचन करतात.**



अमान्य करता येत नाही.

एप्सिलॉनमधून येणारी विज्ञान कविता ही विशुद्ध विज्ञानकविता आहे. प्युअर सायन्स केंद्रीभूत असलेली डॉ. देशपांडे यांची कविता तिथेच थांवली आहे. या कवितेला पुढे नेण्यासाठी काही मार्ग सुचविता येतील. विशुद्ध विज्ञानकवितेकडून विज्ञानस्पर्शी कवितेकडे जाता येईल.

## ।। तीन ।।

विशुद्ध विज्ञानच विज्ञानकवितेच्या केंद्रस्थानी हवे हा दुराग्रह सोडल्याशिवाय विज्ञानकवितेचे हे थांवलेपण हटविता येणार नाही. सर्वच प्रतिभावंतांना विज्ञानाची गोडी असेलच असे नाही. शिवाय नुसती गोडी असल्यामुळे विज्ञानकविता लिहिता येईल असेही नाही. कारयित्री प्रतिभा आणि विज्ञानाचा भक्कम व्यासंग अशा दुर्लभ संगमाशिवाय एप्सिलॉनसारखी विशुद्ध विज्ञानकविता होणे शक्य नाही. मग असा दुर्लभ संगम लाभलेला कलावंत जन्म घेईतो विज्ञानकविता कशी थांबवून ठेवावी?

विज्ञानाच्या भक्कम व्यासंगाचा नाद सोडून देऊन किमान वैज्ञानिक ज्ञान केंद्रीभूत असलेल्या कविता लिहिता येतील. फार तर त्याला विज्ञानकविता या शीर्षकाऐवजी विज्ञानवादी कविता, विज्ञानस्पर्शी कविता असे म्हणावे लागेल. ज्या कवितेला विज्ञानाची पार्श्वभूमी आहे, ज्या कवितेला विज्ञानाची प्रेरणा आहे, ज्या कवितेत वैज्ञानिक जाणिवा प्रकटल्या आहेत, ज्या कवितांचा उद्देश विज्ञानप्रचार, प्रसार आहे, ज्या कविता वैज्ञानिक संकल्पनांचे सुलभ स्पष्टीकरण करतात अशा सर्व कवितांना विज्ञानवादी कविता / विज्ञानस्पर्शी कविता म्हणू या. विज्ञान कविता या शीर्षकातून विशुद्ध विज्ञानाचा प्रखर आग्रह प्रकटतो. विज्ञानवादी कवितेत हा आग्रह फार तीव्रपणे येणार नाही. विज्ञानकथा कादंबऱ्यांबाबत, माधुरी शानभाग म्हणतात, ''एखादी विज्ञानकल्पना मध्यवर्ती ठेवून त्या भोवती कथा-कादंबरी गुंफली जाते. यात विज्ञानाची भूमिका मिठासारखी असते. विज्ञानामुळे उभ्या राहिलेल्या समस्या व विज्ञानामुळे घडलेला बदल हा केंद्रस्थानी असला तरी ही कथा वा कादंबरी शेवटी मानवकेंद्री असते.''[८]

या धर्तीवर विज्ञानस्पर्शी कवितेतही विज्ञानाची भूमिका फक्त चवीपुरत्या मिठासारखी हवी. विशुद्ध विज्ञानकविता त्यातल्या भरमसाट वैज्ञानिक तपशिलामुळे रुक्ष, कंटाळवाणी होते.

उदा. ''व्हिटस्टोनच्या वंशावळीला / प्रायोगिक ध्वनिशून्य समता/ प्रस्थापित करता आली असती / असे वाटत नाही.''[९]

याखेरीज ''श्वासशिशाचे जड झालेले / डोळे विझले जसे रेडियम / तुटले सगळे बंध वेगळे / विद्युदणूंची सुरू पानगळ / विरे रेडियम, उरे शिसे, पण / सरळ चालते उलटे गॅमा.''[१०]

यापेक्षा गरजेपुरते वैज्ञानिक तपशील असलेली विज्ञानकविता रसिकांना भावणारी ठरू शकेल. अशा विज्ञानवादी, विज्ञानस्पर्शी कवितांची ही काही उदाहरणे.

''पृथ्वी म्हणजे खडा चिमुकला
आकाशाच्या खुळखुळ्यातला''[११]

या कवितेचे स्पष्टीकरण करताना अनंत देशमुख म्हणतात- ''आकाशाचा खुळखुळा ही संपूर्ण ग्रहतारकांना वापरलेली कल्पना एकदम वेगळी वाटते आणि खुळखुळा हे त्या लहान मुलाच्या (१९३५-३६च्या काळातील) विश्वाशी स्वाभाविक निगडित वाटते.''[११]

अनंत अशा आकाशात पृथ्वीचे स्थान काय? या भूगोल- विज्ञानातील प्रश्नांचे उत्तर कल्पकतेने देणारे हे रंजक काव्यतुकडे होय.

''एका मिठीत घडला भलता प्रकार आहे / माझ्या मनात अजूनही विद्युत प्रभार आहे / मी मूळचेच आहे अस्थिर मूलद्रव्य / ती स्थिर राहिल्याने जडला विकार आहे''[१२]

या गझलेत विद्युत प्रभार ही भौतिकविज्ञानातील तर मूलद्रव्य ही रसायनविज्ञानातील संकल्पना विशिष्ट अशा मनःस्थितीचे, भावस्थितीचे सूचन करतात.

विद्युत प्रभार जसा काही क्षण टिकून राहतो तद्वत प्रेयसीच्या मिठीचा थरार, रोमांच प्रियकराच्या मनात टिकून आहे. प्रियकरासमान प्रेयसी अस्थिर नाही. यामुळे अपेक्षित 'केमिस्ट्री' दोहोंच्या नात्यात जमून येत नाही. स्थिर आणि





अनुक्रमणिका

अस्थिर मूलद्रव्यांच्या भिन्न गुणधर्मांकडे ही कविता बोट दाखविते. मूळ प्रकृतिधर्म भिन्न असल्याने अपेक्षित असे काही घडून येत नाही ही जाणीव प्रियकराच्या मनोगतातून व्यक्त होते.

वैज्ञानिक तथ्यांच्या भडिमारामुळे विज्ञानकविता गद्यप्राय होते. असा भडिमार विज्ञानकवितांसाठी कर्दनकाळ ठरेल. कवितेचे प्रयोजन जर आपण आल्हाद मानत असू तर विशुद्ध विज्ञानाच्या दुराग्रहाच्या तावडीतून कवितेला अगोदर मुक्त केले पाहिजे. विज्ञानाचा अंश सोप्या भाषेत सांगणाऱ्या कवितेला आपण सन्मानाने विज्ञानस्पर्शी कवितेत स्थान दिले पाहिजे.

उदा. परागकणांचं आदानप्रदान / तेच फुलांचे मैथुन / अन्नाप्रमाणेच मैथुनाची / शरीरास गरज भासते / मैथुनावर बोलणं / समजू नकोस घृणित वाचा''[१४]

वनस्पतीविज्ञानातील तथ्य सांगणारी ही कविता विज्ञानस्पर्शी कविता नाही का? शाळकरी विद्यार्थ्यांचे संबोध दृढ करण्यासाठी अशा प्रासादिक, विज्ञानस्पर्शी कवितांचे स्वागतच व्हायला हवे.

''माझ्या अदृश्य शेपटीचं अवशेष म्हणून / जिथून ज्ञानाची पॅसेंजर स्टार्ट होईल / कुंडलिनीच्या रूपानं / तिथं तर एक माकडहाड आहे अजून शाबूत / म्हणजे मूलाधार चक्र नावाचं स्टेशन / एक मिथ आहे खुल्लमखुल्ला''[१५]

या कवितेत शरीरविज्ञान, योगविज्ञान यांचा संदर्भ आलाय. छद्मविज्ञान हा प्रकार अलीकडे चर्चिला जात आहे. विज्ञान असल्याचा भास देणे, गृहीतक-निरीक्षण-अनुमान-प्रचिती या पायऱ्यांद्वारा न जाताही अमूक एक गोष्ट विज्ञानसिद्ध आहे असे सांगणे असे प्रकार यात होतात. जे मिथच आहे त्याला विज्ञानाचा आधार आहे असा समज पसरविण्यासारखी अशी कृत्ये त्यांच्या लाभार्थ्यांकडून केली जातात. विज्ञानविषयक अंधश्रद्धेचाच हा भाग होय. अशा छद्म विज्ञानाचा बुरखा फाडणाऱ्या कविताही विज्ञानस्पर्शी कविता मानता येतील. विज्ञानाशी निगडित संबोध समाविष्ट असणाऱ्या या कविता विज्ञानस्पर्शी काव्यप्रांतात गणल्या जाव्यात. अशा विज्ञानस्पर्शी काव्यनिर्मितीकडे कलावंतांना वळविले पाहिजे. हा प्रवाह संवर्धित करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांपैकी हीदेखील एक उपाययोजना ठरेल.

मराठीत आईवरच्या कविता विपुल आहेत, अशी ओरड होऊ लागताच मग बापही कवितेचा केंद्रबिंदू म्हणून येऊ लागला. अशाच एका कवितेत बापाचे वर्णन असे येते -

''पुरुष... / विज्ञानाच्या परिभाषेत धन ध्रुव! / पुरुष... / संसाररूपी पृथ्वीचा गाभा जर आई / असेल तर / या संसाररूपी पृथ्वीचे भूकवच असतो तो बाप! / जीवकवचाबाहेरील जीवसृष्टी महणजे मुले / नातेवाईक वा समाजघटक यांच्याकडून / येणारे आघात आधी याच भूकवचावर / येऊन आदळतात. / भूकवचाच्या आतील गाभ्यातून कधी कधी / येणाऱ्या भूकंपाच्या धक्क्यानेही / आधी भूकवचालाच तडे जातात.''[१६]

या कवितेत बापाला त्याच्या व्यक्तिमत्त्वास अनुसरून धन ध्रुव, भूकवच या उपमा दिल्या आहेत. कवितेचे प्रमुख भाव बापवृत्तीदर्शन असला तरी भूविज्ञानातील संकल्पनांचे घेतलेले साहाय्य येथे लक्षणीय आहे. शालेय वा विद्यापीठीय विद्यार्थ्यांना विज्ञानसिद्धांत समजावून सांगण्यासाठी ही कविता उत्तम नमुना आहे. आपली दैनंदिन अनुभूती विज्ञानात शोधण्यासाठी जर ही कविता मदत करीत असेल तर ती विज्ञानस्पर्शी कविता म्हणून का स्वीकारू नये?

''तुझ्या कविता / आणि / प्रेम प्रकरणं / समांतर रेषेत जात असतांना / एका नकळत क्षणी / रेषेवरचा ठळक बिंदू होत गेलेली मी / कधी झाले तिरकस वक्र / आणि / वाढत गेले तुझ्या भोवती / वर्तुळासारखी / तुलाही कळलं नाही! / आता तू / त्या वर्तुळाची त्रिज्या / केंद्रापासून परिधावरच्या / कोणत्याही बिंदूला स्पर्श करणारी / वर्तुळाचं क्षेत्रफळ काढतांना / आवर्जून मोजली जाणारी / एक केवळ गणिती संकल्पना! / कागद असो की / आयुष्याचं प्रतल / त्रिज्येला वर्तुळापलीकडे अस्तित्व नाही / हे लक्षात आलंय का तुझ्या?''[१७]

पुरुषाला स्त्रीशिवाय अस्तित्व नाही हा समाजविज्ञानातला सिद्धांत गणितविज्ञानातील संकल्पनांच्या साहाय्याने या कवितेतून अधोरेखित होतो. विज्ञाननिष्ठ प्रतिमा, प्रतीकांच्या योजनेमुळे कवितेची व्यामिश्रता वाढते, कवितेला प्रयोगमूल्य लाभते. यातून कविता आणि विज्ञान दोहोंचेही भलेच होते.

खगोलविज्ञान, औषधविज्ञान, जेनेटिक विज्ञान, संगणक विज्ञान, भाषाविज्ञान, मनोविज्ञान यांसारख्या विज्ञानशाखांतील तत्त्वांचा स्पर्श असणाऱ्या कविता मोठ्या प्रमाणात यायला हव्यात. विज्ञानकवितेकडून विज्ञानस्पर्शी कवितेकडे जायला हवे. विज्ञानस्पर्शी कवितेत एकच जरी विज्ञानप्रतिमा आली तरी तिला या प्रवाहात सामावून घ्यायला हवे.

उदा. आधुनिक विज्ञानाचा नवा शोध म्हणजे कृत्रिम बुद्धिमत्ता होय. ह्या संकल्पनेवर प्रकाश टाकणारी ही कविता बघा-

''ती सध्या काय करते / स्पर्श, दृष्टी, ध्वनी, चव अशा संवेदनांची / अंगभूत निर्मिती करण्याची आस बाळगते / मानवतावादी विज्ञानाच्या अखिल स्तरावर / कृत्रिम बुद्धिमत्ता ही अपुली संज्ञा / सार्थकी लावते, परिपूर्णतेने ठसविते.''[१८]

अशी विज्ञानातील संकल्पनांचे सुलभीकरण करणारी कविता स्वागतार्ह आहे. विज्ञानसाहित्याचे वेगळेपण अनेकांगांनी सांगता येईल. त्यापैकी एक म्हणजे या प्रवाहाचा वाचकही किमान पातळीवरील विज्ञान साक्षर असावा लागतो.



अनुक्रमणिका

इतर प्रवाहातील वाचक केवळ भावयित्री प्रतिभेच्या जोरावर साहित्यकृतीतले मर्म स्वतःसाठी उलगडून घेईल. पण विज्ञान साहित्य विशेषतः विज्ञानकवितेच्या वाचकाला विज्ञानातल्या मूलभूत संकल्पना माहिती असणे अनिवार्य आहे.

विज्ञानाचे क्षेत्र क्षणाक्षणाला विस्तारत जाणारे क्षेत्र असल्याने नवनवे सिद्धांत, नवीन कल्पना सोप्या शब्दांतून स्पष्ट करणाऱ्या विज्ञानस्पर्शी कविता यायला हव्यात. ट्युरिंग टेस्ट, डेटा माईनिंग, कॉग्निटिव्ह सायन्स, मशिन लर्निंग, ऑप्टिकल कॅरेक्टर रेकग्निशन, नॅचरल लॅंग्वेज प्रोसेसिंग, इंटरनेट ऑफ थिंग्ज या नव्या संकल्पनांचे अर्थ सांगणाऱ्या विज्ञानस्पर्शी कविता जाणत्यांनी लिहायला हव्यात.

मात्र यात एक धोका संभवतो. विज्ञान संकल्पना सोप्या शब्दांत समजावून सांगणे ह्याच एका उद्देशाने विज्ञानस्पर्शी कवितेची निर्मिती करू लागलो तर विज्ञानाचा प्रचार प्रसार करणारी कविता या अंगाने तिच्यावर प्रचारकी कविता असा शिक्का बसण्याची शक्यता असते. काव्यपण जपण्याची काटेकोर दक्षता घेऊन अशा कविता लिहायला हव्यात.

विज्ञानकवितांतील विज्ञानकल्पना नंतरच्या काळात सिद्धांतही ठरतात. विज्ञानकथा कादंबऱ्यांतील कल्पित विज्ञान पुढे जाऊन वास्तव विज्ञान होते. कल्पित विज्ञानातील विज्ञान सूत्रे पुढील संशोधनाला दिशा दाखवतात, चालना देतात. तद्वत विज्ञानकवितेतील एखादी कल्पना पुढे जाऊन विज्ञान तथ्यातही परावर्तित होते. 'देवदूत'मध्ये सुधाकर गायधनी लिहितात-

''या पुढचे पलिकडचे / ते अंगुराचे घनदाट अरण्य ओलांडतांना / तेथील विषयलोलूप माद्यांचे / पाठलाग करायची इव्लत मनात येते / आणि पक्षिमित्र समागमानंतर / नकळत नरालाच गर्भधारणा होते''[११]

लिंगबदल शस्त्रक्रियेने पुरुष बनलेल्या थॉमस बेटी याने गर्भधारणेपश्चात कन्याअपत्यास जन्म दिल्याची वार्ता टेलिग्राफने दिली होती. तेव्हा एखादी कल्पना विज्ञानाद्वारे वास्तवात येत असेल तर अशा कवितेलाही भविष्यसूचक विज्ञानस्पर्शी कविता म्हणावे लागेल.

डॉ. पंडित विद्यासागर यांनी 'ओवी गाऊ विज्ञानाची' या संग्रहातून वैज्ञानिकांची चरित्रे लिहिली आहेत. ओवी हा मराठी मनाचा आवडता छंद प्रकार होय. विज्ञानाचा तपशील, वैज्ञानिकांचे कार्य गद्यापेक्षा पद्यातून सांगितले गेले तर विज्ञान प्रचार-प्रसारासाठी ते उपयुक्त होईल म्हणून डॉ. विद्यासागर यांनी हा ओवी प्रपंच केला असावा.

उदा. १) न्यूटनच्या नियमाबद्दलच्या ओव्या :

''पृथ्वीमाजी आकर्षण बल। आकर्षी वस्तूंना सकल।
गुरुत्वाकर्षण नाव राहील। निश्चय त्याने केला हा ।।''

२) ''वस्तूमधील अंतराच्या। व्यस्त प्रमाणात तयाच्या।
गुणकारी वस्तुमानाच्या। बल त्याच्या समप्रमाणात ।।''

३) गुरुत्वाकर्षण बल कसे काढावे / वस्तुमानांना गुणावे / त्यास दोन्हीतील अंतरवर्गाने भागावे / बल त्या प्रमाणात असे''[१२]

लोकवाङ्मयाच्या छंदातून रुक्ष मानले जाणारे विज्ञानही सांगता येऊ शकेल हा नवा आशावाद या ओव्यांनी जागवला आहे.

जी गोष्ट विज्ञानओव्यांची तीच विज्ञानकोड्यांची! कूटप्रश्न, कोडी या लोकवाङ्मय घटकांचे समाजमनाला प्राचीन काळापासून आकर्षण आहे. विज्ञानसूत्रांचे स्पष्टीकरण सुलभतेने करणारा प्रकार म्हणून या काव्यकोड्यांकडे पाहता येईल.

उदा. १) घेतली एक गोल तवकडी / सात रंगात समान विभागली / उचलून ती स्टॅंडवर बसवली / हाताच्या साहाय्याने गोल फिरवली / सप्तरंगी तबकडी पांढऱ्या रंगात बदलली / किमया ही सारी न्यूटनने दाखवली

२) वस्तूंच्या कंपनाने होतो मी निर्माण / कानामुळे होते माझे ज्ञान / सतारीच्या तारामधून निर्माण होणारे तत्त्व / कंपने असेपर्यंत असते माझे अस्तित्व / लहरीच्या स्वरूपात पसार होतो / वायू, द्रव्य, स्थायू असा वेग वाढत जातो. / उत्तर ध्वनी

विज्ञानस्पर्शी कवितांच्या आणखी काही उदाहरणांची चर्चा करता येईल. विज्ञान मग ते कोणत्याही क्षेत्रातील असो, त्या विज्ञानाचे एखादे सूत्र, एखादीच घटना जरी कवितेत अंतर्भूत असेल तरी तिला विज्ञानस्पर्शी कवितेच्या प्रांगणात समाविष्ट करू या.

व्याकरणशास्त्रात अवतरण चिन्हांचे महत्त्व नव्याने सांगण्याची गरज नाही. या अवतरण चिन्हांच्या आकारांशी असलेले मानवी भावनांचे नाते सांगणारी प्रा. रमेश माने यांची ही कविता-

''विद्यार्थ्याने काही चूक केल्यावर / कान पिळणाऱ्या शिक्षकासारखा / 'उकार' / देशाच्या सीमेवर / मातृभूमीचं रक्षण करण्यासाठी / डोळ्यांत तेल घालून / पहारा करणाऱ्या / जवानासारखा 'अनुस्वार' /सासरी जातांना / हुंदके देत देत / बापाच्या गळ्यांत / हात घालून रडणाऱ्या / लेकीसारखी 'वेलांटी''[१३]

बालगीत, बडबडगीतांमधूनही विज्ञानसूत्रे येतात. मात्र. रुक्षता टाळण्याचे कसब कवीकडे असावे लागते. पर्जन्यशास्त्र, जलचक्र या निसर्गविज्ञानाशी निगडित विज्ञानसूत्रांचे बालकवितेतील हे सुलभीकरण पाहा.

'काळा काळा कापूस पिंजला रे / ढगांशी वारा झुंजला रे'

'नाच रे मोरा' या सुप्रसिद्ध बालगीतातल्या या ओळी आहेत. कृष्णमेघांनी कापसाची उपमा, मेघांशी वाऱ्याचे होणारे घर्षण ही विज्ञानतथ्ये सोप्या शब्दांत परिचित उपमांच्या साहाय्याने सांगितली आहेत. रंजनासह प्रबोधन या भूमिकेतून

अशी बालगीते लिहिली जातात, जावीत.

डार्विनचा उत्क्रांतिवाद किती सोप्या शब्दांत सांगितला जाऊ शकतो हे विंदांच्या कवितेवरूनही लक्षात येईल.

''माकड हसले त्याच क्षणाला
माकड मेले माणूस झाला''

वनस्पतीची अन्नग्रहण प्रक्रिया, वाढप्रक्रिया ही वनस्पतीशास्त्राशी निगडित विज्ञानसूत्रे संत ज्ञानेश्वरांच्या काव्यात अशी येतात-

''मरूस्थळीचा झाडोरा । पानात साठवी नीरा ।
निभावण्यास गुजारा । शुष्क काळी ।।''

'पारीयाचा रवा' शब्दबंधही ज्ञानेश्वरांच्या काव्यात येऊन गेला.

गणित शास्त्रात मॅट्रीक्स म्हणून एक गणिती प्रक्रिया येते. ह्या गणिती प्रक्रियेवर आधारित एक कविता एप्सिलॉन (डॉ. शिरीष देशपांडे) यांच्या कवितेत येते. मॅट्रीक्स असा सोडवला जातो.

$$\begin{bmatrix} A & B \\ C & D \end{bmatrix} \times \begin{bmatrix} W & X \\ Y & Z \end{bmatrix}$$

या मूळ गणिती प्रक्रियेवरील अस्मादिकांची एक कविता अशी -

| नवरा | बायको | x | प्रेम | भांडण |
|---|---|---|---|---|
| प्रियकर | प्रेयसी | | घरी | दारी |

| | x | |
|---|---|---|
| नवरा प्रेम तर बायको घरी | | नवरा भांडण; बायको दारी |
| प्रियकर प्रेम तर प्रेयसी घरी | | प्रियकर भांडण; प्रेयसी दारी |

गणिती सूत्रे आणि समीकरणे, प्रमेये मानवी जीवनाशी निगडित असल्याचे सूचन ही विज्ञानस्पर्शी कविता करते.

खगोल विज्ञानात घडणाऱ्या घटना व समकालीन मानवी जीवनात घडणाऱ्या घटना यातील अंतर्विरोधावर भाष्य करणारी कविता हीदेखील विज्ञानस्पर्शी कविता होय. याच्या पुष्ट्यर्थ अस्मादिकांचीच ही एक विज्ञानस्पर्शी कविता पाहा-

''सात वर्षाच्या प्रवासातून तू गेलास / अवकाशाच्या पोकळीतून मार्गक्रमण करीत / अमंगळ मंगळाच्या जवळून / पाठवलीस चित्रे पृथ्वीवर... / तेथील जीवनाच्या शक्यतांवरील । / संशयाचे पडदे हटवून / नि दिलेस उपवरांना दिलासे.../ तू तुझे कार्य करून । / नेपच्यूनच्या वातावरणात शहीद झालास... / येथल्या मंगळमंदिरावील / गर्दी मात्र हटत नाही / दानपेटी, पूजा विक्रेते, यांना मरण नाही / अवकाशयानात नागबली पूजा / गुरुवर भूमिपूजन... / हे आमचे टप्पे.. असे देत, / छद्मविज्ञानातही तृप्त होऊन ढेकर देऊ देत. / तू मात्र / अंतिम सत्याच्या शोधात निघाला आहेस / अवकाश मंडळे भेदत राहा / नागडे सत्य मांडत राहा / घेतला वसा निभावत राहा''

## ।। चार ।।

विशुद्ध विज्ञानकविता त्यातल्या क्लिष्ट भाषेतल्या विज्ञान सिद्धांतामुळे दुर्बोध होते. ही दुर्बोधता या कवितेला लोकप्रिय ठरण्यातील मोठी अडचण ठरते. विशुद्ध विज्ञानकविता वाचकांसाठी विज्ञान व्यासंगाची पूर्वअट ठेवते. विशुद्ध विज्ञानकविता आजही तुरळकच आहे. विज्ञानयुगात विशुद्ध विज्ञानकविता लिहिली अथवा वाचली न जाणे ही दुर्दैवी गोष्ट आहे. या पार्श्वभूमीवर विशुद्ध विज्ञानकवितेऐवजी सोप्या भाषेतली विज्ञानस्पर्शी कविता वाचकांच्या पसंतीस उतरायला हवी. तसे झाले तर काही एक कालखंडानंतर विशुद्ध विज्ञानकवितेकडेही वाचक-लेखक वळू शकतील. तशी पायवाट निर्मिण्याची जबाबदारी विज्ञानस्पर्शी कवितेवर आहे.

संदर्भ :


१. देशपांडे डॉ. शिरीष (२००१), एप्सिलॉन ग्रंथाली, मुंबई, पृष्ठ ८
२. देशपांडे डॉ. शिरीष, उनि. पृष्ठ ९.
३. देशपांडे डॉ. शिरीष, उनि. पृष्ठ ९.
४. देशपांडे डॉ. शिरीष, उनि. पृष्ठ ११.
५. डबीर, दिलीप (२००१), एप्सिलॉन (प्रस्तावना) ग्रंथाली, मुंबई, पृष्ठ १४.
६. डबीर, दिलीप (२००१), एप्सिलॉन (प्रस्तावना) ग्रंथाली, मुंबई, पृष्ठ २१.
८. शानभाग, माधुरी (२००४), मराठी विज्ञान साहित्य, संपा. प्रा. म. सु. पगारे), प्रशांत पब्लिकेशन्स, पुणे, प्रथम आवृत्ती, पृष्ठ ९३.
९. डॉ. देशपांडे, शिरीष, उनि. पृष्ठ ४९.
१०. डॉ. देशपांडे, शिरीष, उनि. पृष्ठ ३२.
११. वैद्य, वसंत ललित, मुंबई, ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१७, पृष्ठ ४५.
१२. देशमुख, अनंत, ललित मुंबई, ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१७, पृष्ठ ४५.
१३. देशपांडे, शिल्पा, यू ट्युबवरील गझलसंध्या
१४. चौधरी, शिवा (२०१८), इ-काव्यसंग्रह, विचक्षण प्रकाशन, शिरपूर
१५. राजपूत, सत्यपालसिंग, सत्याग्रही विचारधारा, पुणे, नोव्हेंबर २०१७, पृष्ठ २०७.
१६. जाधव, अनिल, व्हॉटस् ॲप ग्रुपवरील कविता
१७. राऊळ, योगिनी, व्हॉटस् ॲप ग्रुपवरील कविता
१८. वेलिंगकर, मिलिंद- मराठी विज्ञान परिषद पत्रिका, दीपावली २०१७, पृष्ठ १५.
१९. गायधनी, सुधाकर (१९८१), देवदूत पृष्ठ १५, १६.
२०. विद्यासागर, डॉ. पंडित (२०१७), ओवी गाऊ विज्ञानाची, डायमंड पब्लिकेशन, पुणे.
२१. माने, डॉ. रमेश, लोकमत दिवाळी अंक- २०११.


●


डॉ. फुला बागूल,
शिरपूर, जि. धुळे
चलभाष : ९४२०६०५२०८





अनुक्रमणिका



समीक्षा

डॉ. शंकर बोऱ्हाडे



**मनोहर विभांडिक यांच्या 'ह्या एका दुएसाठी' या काव्यसंग्रहातील कविता या केवळ सामाजिक घटनांवर भाष्य करीत नाहीत, तर समकाळाचे दस्तऐवजीकरण करतात. या काव्यसंग्रहाचे मर्म उलगडून दाखवणारा लेख...**





ह्या एका दुऐसाठी (कवितासंग्रह)
मनोहर विभांडिक
प्रतिमा पब्लिकेशन, पुणे
पृष्ठे : १२८
मूल्य : १५०/- रु.



# मनोहर विभांडिक यांची कविता



"मी कवितेलाच सगळ्या साहित्याचा मध्यवर्ती असा भाग समजतो, कारण कवितेमध्येच तुमची भाषा पणाला लावता येते आणि पूर्णपणे अंतर्मुख झाल्याशिवाय कविता लिहिता येत नाही, कारण तुमच्या अंतर्मनात कवितेचे धागे जुळायला लागतात आणि ते फार सूक्ष्म असल्यामुळे तुम्हाला पूर्णपणे आत अंतर्मुख होऊनच ते पाहावे लागतात. म्हणजे तुकारामानं जसं म्हटलंय की, 'आपुलाचि वाद आपणाशी'. त्याच्याशिवाय ते धागे आपणाला कळत नाहीत. म्हणून मला तो कवीचं सगळं महत्त्व पणाला लावणारा प्रकार वाटतो:" - भालचंद्र नेमाडे .

(निवडक मुलाखती (२००८) पृ. ९५-९६)

॥१॥

'ह्या एका दुऐसाठी' हा मनोहर विभांडिक यांचा कवितासंग्रह वाचत असताना मला नेमाडेंचा साहित्यविचार आठवत होता. मनोहर विभांडिक यांची कविता सर्व पूर्वसूरींना दूर सारून अभिव्यक्त झाली हे त्यांचे यश. गेली चार दशके लिहिणाऱ्या या कवीला त्याची कविता गवसली असे सारखे वाटत होते. अनलंकृत सुबोध भाषा हे त्याचे वैशिष्ट्य आणि प्रतिमांच्या राशीची आरास न मांडता कवी थेट अनुभवाला भिडला हे त्याचे दुसरे वैशिष्ट्य. मनोहरची कविता ग्रामीण, दलित, नागर, महानगरी, स्त्रीवादी, सामाजिक अशा कोणत्याच चौकटीत आस्वादता येत नाही. कवी अनुभव मांडत जातो. त्यातून पूर्वानुभवाचे एक सुंदर चित्र तयार होते. हा पूर्वानुभव समकालीन वास्तवाला अधोरेखित करणारा आहे. कोणतीही साहित्यकृती जर त्या लेखक, कवीचं अंशतः आत्मचरित्र असेल तर मनोहर विभांडिक यांची कविता या निकषाला पात्र ठरते. कोणत्याही गाव सोडून शहरात स्थिरस्थावर होऊ पाहणाऱ्या आणि मध्यमवर्गात स्थिरावलेल्या माणसाचे ही कविता आत्मचरित्र ठरेल एवढी ती प्रातिनिधिक कविता आहे. १९७०च्या दशकात बालपण व्यतीत करणाऱ्या कोणाहीं व्यक्तीला ही कविता आपले आत्मचरित्र वाटेल असे या कवितेचे विश्व आहे.

१२८ पानांच्या या कवितासंग्रहात फक्त ४२ कवितांचा समावेश आहे. यावरून कवितेचे दीर्घत्व सूचित होते. कवितेची शीर्षके 'कुंकू. उत्खनन. गल्ला. पगार, देखावा, दप्तर, निरोप' अशी एकाक्षरी असली तरी त्यांची संख्या कमी आहे. बहुतेक शीर्षके विधानात्मक स्वरूपाची आणि अन्वयार्थक आहेत. 'वडिलांच्या खांद्याइतकी उंच जागा', 'वडील आठवतात एखाद्या प्राचीन संस्कृतीसारखे', 'देव आमच्या घरी वर्षभर रावायचे', 'आईच्या डोळ्याभोवतीची काळी वर्तुळं', 'हिशेब दुकानदारांचा आणि वडिलांचा', 'हा



अनुक्रमणिका

जरीचा कपडा टोचेल तुला', 'मुलगा माझा शिकतो आहे', 'मी शोधतो आहे साधू मागे वळून पाहाणारा', 'झोपेविषयी जागेपणी केलेले चिंतन', 'हा सारा बकवास आहे', 'ते आज पावसाविषयी बोलले', 'पाऊस मला हवा आहे फक्त बातमी होऊन आलेला', 'सोबतीला असायचे गाणे', 'बंद पडलेल्या घड्याळाला हटविण्याची मागणी', 'मी बघितले नाही कधी त्यांना स्वप्न सांगताना', 'जात पण लयी मेन असते साहेब...', 'ओशाळून बसली आहे नोट पाकीटात' ही शीर्षके हे या कवितासंग्रहाचे वजन आहे. नाशिकमधल्या या कवीच्या एका कवितेचे शीर्षक 'चुलीवरची मिसळ' असेही आहे. प्रादेशिक आविष्कार समजावून घ्यायला हे शीर्षक उपयोगी ठरावे.

सत्तरच्या दशकात बालपण गेलेल्या व्यक्तीचा हा भाषिक आविष्कार आहे, असे मला वाटते. बहात्तरचा दुष्काळ, दुष्काळात झालेली स्थलांतरे, 'गरिबी हटाव'ची घोषणा हे सारे आठवले की या कवितेतील वास्तव कळायला मदत होते. रोटी, कपडा और मकानची लढाई लढण्याचा हा काळ या कवितेतून व्यक्त होतो. ते व्यक्त होणे लाऊड नाही तर संयतपणे येते. 'हा जरीचा कपडा टोचेल तुला' ही कविता आईवडील आणि मुलाचा संवाद आहे. दिवाळीला आई मुलांच्या फाटत आलेल्या कपड्यांची आठवण द्यायची. अगदी वडिलांनाही स्वतःसाठी नवा कपडा घ्यायची भुणभूण लावायची. वडीलही बघू बघू करत कपड्याच्या दुकानात पोरांना घेऊन जात. दुकानातील लाल निळे, हिरवे पिवळे, जरतारी, रंगीत धाग्यांनी भरलेले, सुंदर चित्रांनी नटलेले, रेशमी झुळझुळीत, तलम चकचकीत कपडे मुलांच्या अंगावर लावून पाहायचे आणि किमती पाहून मुलांना समजवायचे, हा जरीचा कपडा टोचेल तुला, ह्या रंगाला चिडवतील मुले, भरतकामवाला उसवून जातो आणि झुळझुळीत कपडा कमरेतून ओघळून जातो. मुलांना रोज वापरायचे वाढत्या अंगाचे मळखाऊ कपडेच वडील घेत. दिवाळीतही गरिबीचे चटके बसलेल्या पिढीची ही आत्मकथा या कवितेतून साकारत जाते. दुकानातून उधार आणून घर चालविणारी पिढी दुकानदाराच्या हिशेवाबाबत कधी कुरकुर करीत नसे. भावाविषयी आणि मालाविषयी त्यांची तक्रार नसे. हिशोब दुकानदाराच्या आणि वडिलांच्या परस्पर विश्वासावर पूर्ण होत असे. कवीला हे हिशेबाचे कोडे वडिलांच्या समजदारीतून सुटत असल्याचे नंतर फार फार काळानेच कळले. आता आपण मॉल मध्ये जाऊन कार्ड स्वाइप करतो. प्रोव्हिजन स्टोअर्समध्ये रोकडा मोजतो पण त्या काळात उधारीच्या वह्या असायच्या. किराणा दुकानाची अर्थव्यवस्था या वह्यांवर आणि महिन्याचे पगारावर अवलंबून होती. असुरक्षित क्षेत्रातील कामगारांना आठवड्याने पगार मिळत. हा काळ या कवितेतून सहज डोळ्यांसमोर उभा राहतो. कुरतडलेले बालपण आठवत राहते. या दृष्टीने 'गल्ला' ही कविता लक्षणीय आहे. मुलांना लहानपणापासून बचतीची सवय लावणारे पालक होते. खाऊचे पैसे साठवून स्वप्न रंगवण्याचा तो काळ. शाळेतूनही बचत खाते काढण्याची योजना राबवली जात होती. घरात गल्ला असला तर मुलांनी पैसे त्यात जमा करायचे. गल्ला फोडल्यावर त्यातले रुपये पैसे मोजण्यातही गंमत असायची. सत्तरच्या दशकात एक पै, दोन पैसे, तीन पैसे, पाच, दहा पैसेही चलनात होते. ती तांब्या पितळेची नाणी आजही साठीकडे झुकलेल्या किंवा साठी पार केलेल्या पिढीला आठवत असतील. त्या काळात चार आण्यालाही मोठी किंमत होती. अशा काळात गल्ल्यातील बचतीतून मुलांची स्वप्न थोडीच पूर्ण होत? अखेर पुढच्या दिवाळीचं आश्वासन घेऊन गल्ला परंपरेने पुढे सरकत राहायचा. साध्या साध्या विषयांत कवीने काव्य शोधले आहे. बेकरी पिझ्झा हटच्या जमान्यात 'गुळ खोबरं' हा सुद्धा कवितेचा विषय विभांडिकांनी केला आहे. समकालाला भिडणारी कविता आपल्या बालपणाच्या अनुभवातून कवी लिहितो. 'भाकरीचा चंद्र' मराठी कवितेत सुर्वेमास्तरांनी आणला. आता भाकरीचा संघर्ष राहिला नाही. भाकरीचं टोपलं आणि भाकरीची जागा पोळ्यांच्या डब्याने घेतली. चूल गेली आणि चुलीवरची भाकरही कवितेतून हद्दपार झाली.

।।२।।

'ह्या एका दुऐ'साठी ह्या कवितासंग्रहात आई आणि वडील सतत भेटतात. आई आणि वडिलांचे अनेक अनुभव कवितेत येत राहतात. 'कुंकू' या कवितेत आईची सकाळी कुंकू लावण्यासाठीची लगबग आणि आरसा न घेताच तिचे गोलगोल रुपया कुंकू लावणे असा अनुभव कवी कथन करतो. कुंकू हे भारतीय संस्कृतीचं प्रतीक असल्याचे फकीर महंमद शहाजिंदे या कवीनेच नोंदवून ठेवले आहे. काळ बदलला. कुंकू आणि कुंकवाच्या करंड्याची जागा रंगीबेरंगी टिकल्यांनी घेतली. पर्समध्ये टिकल्यांचे पाकीट आले. कवीला आईचा देवघरातील कुंकवाचा करंडा आठवतो आणि वडिलांची काळजी करणारी आई आठवते. आईच्या डोळ्यांभोवतीची काळी वर्तुळं नांदणाऱ्या मुलींच्या काळजीतून आलेली. वडील मुलींना भेटून येताच किंवा मुली सणावाराला माहेरी आल्यावर ही काळी वर्तुळं निघून जात. श्यामच्या आईसारखी सश्रद्ध आई या कवितेत भेटते.



अनुक्रमणिका

[
**मनोहर विभांडिक यांची कविता मला भालचंद्र नेमाडे यांच्या देशीवादाचे उपयोजन वाटते. आई, वडील, देव, देव्हारा, जत्रा, डोंबाऱ्याचा आणि गारुड्याचा खेळ, गुळ खोबरे, लाडवाचा डबा ही सारी अडगळ त्यांच्या कवितेत येत राहते. देशी भाषा हे या कवितेचे वैशिष्ट्य आहे. कवी सुबोध भाषेत गतकाळातील दु:ख, दैन्य, दास्य आणि त्यातले सांस्कृतिक संचित मांडत जातो.... कमलाकर देसले यांनी कवीची पाठराखण करताना म्हटले आहे, या कवितेतील अनुभव भूतकाळाशी निगडित असला तरी त्यातील प्रश्नांची आणि दु:खाची समकालीनता वर्तमानाशी फारकत घेत नाही. व्यष्टी आणि समष्टीला कवेत घेण्याची आणि त्याचे शुभंकर करणारी दुआ या या कवितेचा अंत:स्वर आहे. कवितेत तो व्यक्त होतो आणि कविता वाचकाला खिळवून ठेवते, हे या संग्रहाचे यश आहे.**
]

ती मुलांना सर्दी पडसे, ताप खोकला झाला तरी देवाचा धावा करते. अशी सश्रद्ध आई सत्यनारायण घालायची आणि एका सत्यनारायणाच्या पूजेनेही देव वर्षभर घरी राबायचे, असे कवीने म्हटले आहे. कवितेतील वडील गंभीर, संयत आणि मितभाषी आहेत. ते घरात फार बोलत नाहीत, तरी घराचं गोकुळ होऊन जातं. वडिलांच्या खांद्यावरची उंच जागा आता मिळणार नाही याचे भान वडील गेल्यावर येते. वडील आठवतात एखाद्या प्राचीन संस्कृतीसारखे. अशी कविता वडिलांविषयीची कृतज्ञताच व्यक्त करते. त्यासाठी कवीला कृतक् अलंकारिक प्रतिमांच्या राशी रचाव्या लागत नाहीत. मराठी साहित्याने आईला मोठा अवकाश दिला पण बापाला फार मोठी जागा दिली नाही. मनोहर विभांडिक यांची कविता वडिलांना समजावून घेते.

'वडील फार बोलत नसत,
येता जाता दटावत नसत
की नसत हसत, खिदळत
वडील फक्त असत
अवती भोवती
ऊबदार पांघरुणासारखे,
साऱ्या घराला ऊब पुरवत!' (पृ. १४)
किंवा
'वडील उचलून घेत अलगद खांद्यावर
बसवून घेत तेंव्हा
फळीवरच्या लाडवाला
साखरेच्या डब्याला, छतावरच्या दिव्याला,
मंदिरातील घंटेला, पार आभाळाला
सहज स्पर्शून घेत माझे इवलेसे हात...' ( पृ ११ )

असे शब्दचित्र कवितेत येते. मुलाला खांद्यावर घेऊन गारुड्याचा आणि डोंबाऱ्याचा खेळ, जत्रा, देव, कुस्त्याची दंगल दाखविणारे वडील डोंबाऱ्याच्या खेळातील भुकेची लढाईही मुलांना समजावून सांगतात. जित आणि जेते यांच्याविषयीचे तत्त्वज्ञानही मुलांना सांगतात. वडील कवीला प्राचीन संस्कृतीसारखे वाटतात. कवी हा वडिलांचा वारसाच पुढे चालवतो, पण काळ बदलल्याचे भानही त्याला येते. मुलगा आणि कवी यांच्या संबंधाचे चित्रण करताना ते स्पष्ट होत जाते. वडील घरात येताच मित्र निघून जायचे, वहिणीच्या मैत्रिणीही एकदम चूप व्हायच्या आणि आईही त्यांच्या आगमनाने डोलणारी फांदी व्हायची. वडील घरात येताच व्हायचे घराचे देवघर. आज ती परिस्थिती राहिली नाही. वडिलांचा काळाच्या ओघात फादर, डॅड, पप्पा झाला आणि घराचे होम थिएटर होऊन गेले, असे कवीने नोंदवून ठेवले आहे.

'माझे घर
झाले आहे
वस्तूंचे अभयारण्य;
आणि त्यात मी
उपरा
नामशेष होत जाणाऱ्या
प्राण्यासारखा' (पृ.४०-होम थिएटर)

वृद्धाश्रम संस्कृतीकडे आपली वाटचाल चालू आहे, त्याच्या खाणाखुणा आजूबाजूला दिसत आहेत. मुलं आपली भविष्याची गुंतवणूक समजणाऱ्या पालकांचा भ्रमनिरास करणाऱ्या काळात आपण वावरत आहोत. मनोहर विभांडिक यांची संवेदना भारतीय संस्कृतीचे चित्रण करणारी संवेदना आहे. एका सामान्य कुटुंबातील घडामोडी टिपणारी ही कविता समष्टीचा अनुभव मांडत राहते.

॥३॥

कवी, लेखकांचे प्रारंभिक लेखन हे पूर्वसूरींच्या प्रभावातून आलेले असते. वाङ्मयीन पर्यावरणाचा परिणाम लेखकाच्या लेखनावर पडलेला असतो. त्यातून मुक्त होऊन कविता लिहिता येणे महत्त्वाचे असते. अरुण काळे यांचे 'रॉक गार्डन' हे अलीकडच्या काळातील प्रातिनिधिक उदाहरण पण 'नंतर आलेले लोक'मध्ये अरुण काळेची स्वतःची कविता अरुणला सापडली. संजय चौधरीने 'माझे इवले हस्ताक्षर' हा संग्रह उशिरा प्रसिद्ध केल्याने प्रारंभिक

खर्डे प्रसिद्ध केले नाहीत. 'कविताच माझी कबर' हा त्याचा बहुआयामी कवितासंग्रह पूर्वसूरींच्या प्रभावातून बाहेर पडून स्वतःची पायवाट तयार करतो आहे. संतोष पद्माकर पवारची कविता अशीच स्वतंत्र बाण्याची कविता ठरली आहे. मनोहर विभांडिक यांची या संग्रहातली कविताही स्वतःची नाममुद्रा घडविताना दिसते. ती एका काळाचे दस्तऐवजीकरण तर करते. त्यातला समाजविचार उच्चारवाने येत नाही तर संयतपणे येतो. ही कविता स्वान्तःसुखाय स्वरूपाची नाही. ती समाजभाष्यही करते. 'निरोप' या कवितेतील मुलगी वडिलांना सांगते,

'महात्मा गांधी रोडने येऊ नका;
तिथे सुरीहल्ले होतात
येऊ नका साने गुरुजी मार्गाने
तिथे लुटून घेतात
अब्दुल हमीद चौकातून
तर येऊच नये कधी;
तिथे कायम कर्फ्यू लावलेला असतो!
येऊ नका शिवाजी रोडने लपत छपत,
सावरकर मार्गाकडे ढुंकूनही पाहू नका,
चुकूनही गुणगुणू नका-
एखादे राष्ट्रगीत, भावगीत, भक्तिगीत
धर्म, देश, पोलिस, पुढाऱ्यांविषयी
चकार शब्दही बोलू नका
तुम्हाला हवे तर फक्त
'आज फार उकडतं'
एव्हढेच म्हणा!' (पृ. ७३)

साहजिकची अशा काळात माणुसकीची भिंत सजते. तिचा इव्हेंट होतो. पाऊस हवा असतो पण बातमीपुरता. मोर्चे, धरणे, उपोषणासाठी बलात्कार झालेल्या स्त्रीची जात महत्त्वाची ठरते. 'जात पण लई मेन असते साहेब...' ही कविता या दृष्टीने लक्षणीय ठरते.

'जात पण लयी मेन असते
ना सायेब
नुस्तं बाई आहे म्हणून
आपण काढले मोर्चेबिर्चे
आन उद्या निघाली बाई
दुसऱ्याच जातीपातीची तर
हायकमांड ठिईल का आम्हाला.' (पृ. ११७)

विभांडिकांचा मूळ पिंड समाजचिंतकाचा आहे. फार पूर्वी त्यांनी 'चाय पाव' अशी फारच संवेदनशील कविता लिहून आपले समाजभान दाखवून दिले होते. मात्र ती समाजशीलता टिकून राहील का? याचीही चिंता कवीला आहे. माणसाची निर्मिती पेशीच्या विघटनातून होते, त्याचा क्लोन बनवता येतो. उद्या आपलाच क्लोन आपला खून तर करणार नाही ना, अशी भीतीही कवीने व्यक्त केली आहे. विमुद्रीकरणानंतर चलनात द्यायची राहिलेली नोट ओशाळून बसली आहे पाकिटात हे कवी सहजपणे नोंदवतो. स्वच्छंदपणे बागडणारी नोट कवीला लग्न करायचे राहून गेलेली मुलगी वाटते. विमुद्रीकरणानंतरची सामान्यांची घुसमट कवितेत येते. तरी रूढार्थाने ही कविता केवळ सामाजिक कविता ठरत नाही. ती समकालाचे दस्तऐवजीकरण करणारी कविता आहे. 'माणुसकीची भिंत', 'जात पाहून निघणारे मोर्चे', 'रस्त्याने होणारी लुटालूट', 'दंगली' ही याची ठळक उदाहरणे म्हणता येतील.

।।४।।

मनोहर विभांडिक यांची कविता मला भालचंद्र नेमाडे यांच्या देशीवादाचे उपयोजन वाटते. आई, वडील, देव, देव्हारा, जत्रा, डोंबाऱ्याचा आणि गारुड्याचा खेळ, गुळ खोबरे, लाडवाचा डबा ही सारी अडगळ त्यांच्या कवितेत येत राहते. देशी भाषा हे या कवितेचे वैशिष्ट्य आहे. शब्दांचा खेळ कवी खेळत नाही. सुबोध भाषेत तो गतकाळातील दुःख, दैन्य, दास्य आणि त्यातले सांस्कृतिक संचित मांडत जातो. कुसुमाग्रज आणि कवी गुलजार हे आपल्या सांस्कृतिक संचिताचे ठेवे. कवीने मुखपृष्ठावर आपल्या संग्रहातील एक कृष्णधवल फोटो वापरला आहे. त्याचे औचित्य संग्रह वाचून झाल्यावर लक्षात येते. कमलाकर देसले यांनी कवीची पाठराखण करताना म्हटले आहे, या कवितेतील अनुभव भूतकाळाशी निगडित असला तरी त्यातील प्रश्नांची आणि दुःखाची समकालीनता वर्तमानाशी फारकत घेत नाही. व्यष्टी आणि समष्टीला कवेत घेण्याची आणि त्याचे शुभंकर करणारी दुआ या कवितेचा अंतःस्वर आहे. कवितेत तो व्यक्त होतो आणि कविता वाचकाला खिळवून ठेवते, हे या संग्रहाचे यश आहे. आपलाचि वाद पेक्षा ही कविता मनाशी संवाद करत नेणिवेतील अनुभवाला शब्दांत पकडून ठेवणारी असल्याने वाचकांच्या मनाची पकड घेते.

●

डॉ. शंकर बोऱ्हाडे
चलभाष : ०९२२६५७३७९१



समीक्षा

डॉ. राहुल अशोक पाटील

# लहू कानडेंची कविता व जाणिवांचे समग्र दर्शन घडविणारे 'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व'



'लहू कानडे यांची कविता म्हणजे मराठी साहित्यातील सोसाट्याच्या वादळाचा एक अंश आहे. क्रांतिपर्व सुरू झाल्याची ही एक खूण आहे.'

- डॉ. भालचंद्र फडके





आपण ज्या समाजात राहतो, त्या समाजात रोज हजारो घटना घडतात. सर्वसामान्य म्हणून आपण त्याकडे दुरून पाहतो. मात्र साहित्यिक-विशेषतः कवी या घटना-घडामोडींचे अधिक संवेदनशील व सूक्ष्म आकलन करून ते आपल्या शब्दांत मांडतो. हा आविष्कार म्हणजे कवीने संवेदनशील वृत्तीने समकाळाचा त्याच्या दृष्टीने लिहिलेला उत्स्फूर्त लेखाजोखा म्हणजे मर्यादित अर्थाने का होईना इतिहास असतो. मराठी साहित्याच्या प्रवाहात १९६० नंतर अशी दृष्टी आणि अभिव्यक्तीही वाढली. परिणामी, मराठी साहित्यामध्ये विविध अंगाने भर पडत राहिली. प्रत्येक कालखंडाची गरजदेखील या समकालीन नोंदींनी बऱ्याच अंशी पूर्ण केली. मराठी साहित्यात साठोत्तरी ही कालमर्यादा आपण महत्त्वाची मानतो कारण अनेक साहित्यबाह्य, सर्वसामान्य घटक यादरम्यान आत्मविश्वासाने लिहू लागले. १९८०पर्यंत यातून अनेक नामवंत साहित्यिक नावारूपाला आले. त्यात आनंद यादव, बाबुराव बागूल, नामदेव ढसाळ, यशवंत मनोहर, नारायण सुर्वे, रा. रं. बोराडे, केशव मेश्राम, अरुण काळे अशी अनेक महत्त्वाची नावे नोंदविता येतील.

**लहू कानडे यांच्याविषयी :**

साठोत्तरी पिढीपासून प्रेरणा घेऊन जी पिढी लिहिती व बोलती झाली, त्या पिढीतील लहू कानडे हे एक महत्त्वाचे कवी आहेत. कानडे यांनी १९७५ पासून काव्यलेखन सुरू केले. संस्कारशील व कळत्या वयात त्यांनी कवितांचे गांभीर्याने वाचन केले. इंग्रजी विषयात पदवी घेतली. महाविद्यालयीन नियतकालिके, भित्तिपत्रके यात कविता लिहून स्वतःला पडताळून पाहिले, मात्र औरंगाबाद येथे पदव्युत्तर शिक्षणासाठी प्रवेश घेतल्यावर त्यांच्या आयुष्याला दिशा मिळाली कारण या काळात 'दलित युवक आघाडी'शी त्यांचा परिचय झाला. महात्मा फुले, राजर्षि शाहू आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचार त्यांना समजू लागले. हा कालखंड तसा अनेक सामाजिक-राजकीय उलथापालथींचा होता, कारण याच काळात दलित अत्याचारांच्या घटना आजूबाजूला घडत होत्या. आंबेडकरी विचारांशी नुकतीच ओळख झालेला हा सुशिक्षित तरुण या घटनांकडे चौकसपणे पाहत होता. चांभारी काम करणारे पूर्वज, त्यांचा कौटुंबिक वारसा, पूर्वपरंपरा यातून त्यांचा एक आत्मशोध सुरू झाला. आजूबाजूला उघड्या डोळ्यांनी पाहिल्यामुळे मनात अस्वस्थता निर्माण झाली आणि कोणतीही पार्श्वभूमी नसताना बरंच काही सुचू लागलं, जे व्यक्त करणं अपरिहार्य बनलं. दरम्यान सुरू असलेले वाचन त्यांना व्यापक दृष्टी देऊन गेले. महाविद्यालयीन जीवनातील प्रारंभिक लेखनाने आत्मविश्वास दिला आणि

आजूबाजूच्या घटनांनी आशय-विषय व व्यक्त होण्याची ऊर्मी दिली. या सगळ्यांचा परिपाक म्हणून १९८० साली 'क्रांतिपर्व' हा त्यांचा पहिला काव्यसंग्रह प्रकाशित झाला. पुढे तब्बल एका तपानंतर १९९६ मध्ये 'टाचाटिभा' आणि २०१२ साली 'तळ ढवळताना' हा तिसरा संग्रह आला. याव्यतिरिक्त, २०१४मधील 'आम्ही हिंदुस्थानी' हा वैचारिक निबंधसंग्रह आणि 'लोकशाहीर अण्णा भाऊ साठे : व्यक्तित्व आणि साहित्य' ही दोन पुस्तकेही त्यांनी लिहिली. आजवरच्या वाटचालीत साधारण पंधरा साहित्य पुरस्कार, शालेय व चार विविध विद्यापीठांच्या अभ्यासक्रमात त्यांच्या कवितांचा समावेश आहे. अनुवादाच्या माध्यमातून त्यांच्या कविता इंग्रजी, उर्दू, हिंदी भाषांमध्ये पोहोचल्या आहेत.

**'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व' संपादनाविषयी :**

१३ डिसेंबर, २०१७ रोजी मराठीतील महत्त्वाच्या समीक्षकांपैकी एक डॉ. महेंद्र कदम यांनी 'अक्षरवाङ्मय प्रकाशना'च्या माध्यमातून 'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व' हा ग्रंथ प्रकाशित केला. लहू कानडे यांच्या कवितेची समग्र समीक्षा करणारा हा ग्रंथ म्हणजे लहू कानडे यांच्या कवितेचे विविध अंगाने आणि विविध जाणकारांनी केलेल्या विश्लेषणाचे संकलन-संपादन आहे. या संपादनातील काही लेख लहू कानडे आणि समग्र दलित कवितेची वैशिष्ट्ये, वेगळेपण मांडतात तर काही त्यांची शैली, आशय-विषय यावर भाष्य करतात. या पुस्तकातील एकूण ४५ लेखांपैकी सुमारे २३ लेख विविध वर्तमानपत्रे व नियतकालिकात पूर्वप्रकाशित आहेत. हे संपादन महेंद्र कदम यांनी ज्येष्ठ अभ्यासक सदानंद मोरे आणि ज्येष्ठ कादंबरीकार राजन गवस यांना अर्पण केले आहे.

ग्रंथात 'क्रांतिपर्व'वर सात, 'टाचाटिभा'वर १९ तर 'तळ ढवळताना'वर १८ लेख लिहिलेले आहेत. कानडेंच्या समग्र कवितेवर शरद गायकवाड, डॉ. किशोर सानप आणि डॉ. सुहासकुमार बोबडे यांचे लेख आहेत. उत्तरार्धात 'एका कवीशी संवाद' या शीर्षकाखाली कवी लहू कानडे यांची संपादक महेंद्र कदम यांनी घेतलेली दीर्घ मुलाखत आणि कानडे यांना वेळोवेळी आलेल्या पत्रांपैकी द. भि. कुलकर्णी, आनंद यादव, पंडितराव पवार, भास्कर लक्ष्मण भोळे, कवी ग्रेस यांची 'निवडक पत्रे' छापलेली आहेत. ग्रंथाच्या अखेरीस लहू कानडे यांचा अल्पपरिचय असलेले हे पुस्तक एकूण ४५४ पृष्ठांचे आहे. मलपृष्ठावर संपादकीय भूमिका सारांशरूपात मांडली असून ग्रंथाचे मुखपृष्ठ सुप्रसिद्ध चित्रकार श्रीधर अंभोरे यांनी रेखाटले आहे.



टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व
अक्षरवाङ्मय प्रकाशन, पुणे
१३ डिसेंबर, २०१७
पृष्ठे : ४५४
मूल्य : ४५० रु.

**'क्रांतिपर्व'मधील कविता :**

'क्रांतिपर्व' म्हणजे ऐंशीच्या दशकातील समकालीन समाजवास्तवाचे प्रतिबिंब आहे. या संग्रहात एकूण ४२ कविता आहेत. 'क्रांतिपर्व' या शीर्षक कवितेतून काळ बदलायला सुरुवात झाली आहे आणि एका क्रांतीसाठी सज्ज झालेला कवी आपल्या पत्नीला खंबीर होण्याचे आवाहन करतो. वर्षानुवर्षे साठवलेले आभाळभर दुःख तो तिच्या कुशीत टाकून क्रांतिपर्वाच्या लढ्याला सहकार्य करण्याची आणि पुढे येऊन लढण्याची अपेक्षाही व्यक्त करतो. सध्याच्या काळातील स्मशानातून जाणारे मार्ग, पेटलेल्या चिता जळण्याच्या काळात तो क्रांतीसाठी व भविष्यात घडणाऱ्या नव्या पर्वाच्या स्वागतासाठी सज्ज राहण्याचे आवाहनही करतो. एकीकडे 'विद्रोह'सारख्या कवितेतून महार-मांगांच्या वाट्याला आलेले उपेक्षितपण व त्यातून निर्माण होणारा विद्रोह कवी जसा संवेदनशीलपणे नोंदवितो, तसाच दुसरीकडे 'वेश्यांच्या गल्लीमध्ये' रात्री होणाऱ्या बेलगाम लिलावांवरही तो लक्ष ठेवतो. टिचभर पोटासाठी मिळेल त्या पैशांत होणारे समर्पण म्हणजे माणसांच्या बाजारपेठेतील ऐतिहासिक उच्चांक आहे. हे शोषण कवी थेट आणि तितक्याच निर्भीड भाषेत मांडतो. याच कवितेच्या शेवटी 'आया' म्हणून या महिलांचा केलेला उल्लेख कवीचे वेगळेपण दर्शवितो. या संग्रहातील कवीचे प्रेमगीत हे विद्रोहाचे आहे. विटाळाच्या भीतीने येथील सूर्यप्रकाश नाकारत, भोगलेल्या यातना आणि पुराणकथा यातील तफावत.

महाकाव्यांमधील अनुल्लेख यामुळे दुखावलेला कवी सखीच्या भांगात क्रांती पेरण्याची भाषा करतो. एवढेच नाही तर, आजच्या काळात दलित-उपेक्षित समाजासाठी आधुनिक, पायरीचे दगड डोक्यात घालणारा आक्रमक 'नवा कीर्तनकार' आवश्यक असल्याचे मतही मांडतो. या व्यतिरिक्त, 'तेव्हापासून' कवितेत आदिम ठसठस, 'इशारा'मधून लढण्यासाठी सज्ज होण्याचे आवाहन, 'कोंडू चांभार'मध्ये जग बदलले तरी न बदलणारा/ सर्व पातळ्यांवर अपयशी ठरलेला सर्वसामान्य चांभार, 'घरकुल'मध्ये समतेसाठी धडपडणारा जीव, 'तो फकीर सांगून गेला' कवितेत प्रेरणा देऊन जगण्याची शक्ती देणारा फकीर अशी विविध पातळ्यांवरची वर्णने लहू कानडे नोंदवितात. यातून कवीची समकाळाकडे, त्यातील घटिताकडे पाहण्याची विचारदृष्टी आणि पुढे येऊन लढण्याची तयारी प्रकट होते.

या कवितांविषयी डॉ. भालचंद्र फडके यांनी काही महत्त्वाची निरीक्षणे प्रस्तावनेत नोंदविली आहेत. विशेषतः 'दलित कवितांचा जन्म आत्मशोधातून झाला आहे. दलित कवितेतील 'मी' हा 'आम्ही' असतो. समाजाला भोगाव्या लागणाऱ्या वेदना, ताणतणाव येथे व्यक्त होतात आणि असे होणे अपरिहार्य आहे. दलित कवीचे गाणे ते भोगत असलेल्या दुःखातून उमलते. समाजव्यवस्थेने निर्माण केलेल्या परिस्थितीमुळे त्याला एकलेपण, दुःख भोगावे लागते, म्हणून अशा कवितेतून व्यक्त होणाऱ्या जीवनानुभवाला सामाजिक संदर्भ आहेत. दलित कवींचा अनुभवच मुळात समाजव्यवस्थेविरुद्ध घेतलेल्या विद्रोही भूमिकेतून जन्मलेला आहे... 'ही कविता म्हणजे मराठी साहित्यातील सोसाट्याचे वादळ आहे,' असे मत प्रकट करत लहू कानडे यांची कविता या सोसाट्याच्या वादळाचाच एक अंश असून 'क्रांतिपर्व' सुरू झाल्याची ही कविता म्हणजे एक खूण आहे, असे निरीक्षणही त्यांनी नोंदविले आहे.

**'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व'मध्ये घेतलेली 'क्रांतिपर्व'ची नोंद :**

मेधा काळे, सतीश बडवे, प्रल्हाद लुलेकर, आशुतोष पाटील, संजय बोरुडे, शंकर वोऱ्हाडे, कैलास दौंड या जाणकारांनी आपली निरीक्षणे या संपादनात लेख स्वरूपात नोंदविली आहेत. 'क्रांतिपर्व'मधील कविता कवीचे आत्मवृत्त मांडणारी कविता म्हणून पाहता येते. बाबासाहेबांचा विचार सर्वसामान्यांपर्यंत पोहोचविण्यासाठी क्रांतिपर्व म्हणजे समूह संवाद असल्याचे मत सतीश बडवे यांनी नोंदविले आहे. मेधा काळे यांनी डॉ. आंबेडकरांचे ऋण ही कविता व्यक्त करते, समतेचे सुंदर स्वप्न पाहते, संस्कृती परंपरेपासून आलेली वेदना, नकार, विद्रोह मानवतेची ही कविता पुढे घेऊन जाते, असे विचार मांडले आहेत तर आशुतोष पाटील यांनी कानडेंचा काळ आणि पार्श्वभूमीचा विचार करून ही कविता म्हणजे 'शोषितांच्या वेदनेचा उद्गार' असे म्हटले आहे. वैयक्तिक जगणे, व्यवस्थेतील घटक म्हणून जगणे, वाट्यास येणारी वेदना-वंचना आणि भेदजन्य व्यवहारांची उतरंड यावद्दल आणि त्यातून त्यांना अपरिहार्यपणे कराव्या लागणाऱ्या संघर्षाबद्दल करुणामय व तितकाच परखड उद्गार व्यक्त करणारी ही कविता आहे, असे निरीक्षण नोंदविले आहे. बोऱ्हाडे यांनी ही कॉम्रेड कविता नसून समष्टी आहे. जग बदलले तरी न बदलणारा कोंडू चांभार आपल्याकडील प्रतिनिधित्व करतो. ऐंशीच्या दशकातील कविता म्हणून या कवितेची नोंद अपरिहार्य असल्याचे मत ते मांडतात. कैलास दौंड प्रगल्भ आत्मभान आणि सामाजिक समतेच्या शोधात असलेल्या कवीचे व्यक्त होणे म्हणजे ही कविता आहे. तसेच, संयत विद्रोह आणि बुद्धिनिष्ठतेचा मेळ या कवितांमध्ये दिसून येतो, असे सांगतात.

**'टाचाटिभा'मधील कविता :**

लहू कानडे यांचा 'टाचाटिभा' हा दुसरा काव्यसंग्रह १९९३ मध्ये 'प्रतिभास प्रकाशन, परभणी' यांच्याकडून प्रकाशित झाला. १९९७ला दुसरी आणि २००९मध्ये त्याची तिसरी आवृत्ती प्रकाशित झाली. यात गंभीर विषयावरील सामाजिक पार्श्वभूमी असलेल्या एकूण ६१ कविता आहेत. या संग्रहातील कवितांपैकी साधारण ३२ कविता शिक्षक असतानाच्या, दहा कविता चर्मकार समाज आणि त्यातील जगण्याच्या बारकाव्यांसह प्रकट झालेल्या आहेत. उर्वरित कवितांमधून विविध आंदोलने, दलितांचे होणारे शोषण आणि एकूणच शोषणव्यवस्था प्रकटते. टाचाटिभा म्हणजे 'चामड्याला कातड्याचा सळ घालून शिवणे' होय. तीन पिढ्यांमध्ये टाचाटिभा, मोलमजुरी करून जगत हे कुटुंब कसेबसे टिकले. जन्मतारखांच्या नोंदी किंवा स्वतःच्या हक्काची नावेही त्यांना मिळाली नाहीत. लहू आणि अंकुश ही नावे बाजूला पडून 'चांभाराची पोरं' म्हणूनच ती ओळखली गेल्याची सल कवीला आहे. या संग्रहातील कविता आणि कवीचे जगणे समांतर आहे. किडामुंगीसारखे जगणे, समाजातील अपप्रवृत्ती, शोषण यातून कवीचे शब्द अधिक धारदार झाले. काव्यसंग्रहात नोंदविलेल्या अपरिचित शब्दांमुळे कविता समजावून घेणे

> या संग्रहातील कवीचे प्रेमगीत हे विद्रोहाचे आहे. विटाळाच्या भीतीने येथील सूर्यप्रकाश नाकारत भोगलेल्या यातना आणि पुराणकथा यातील तफावत, महाकाव्यांमधील अनुल्लेख यामुळे दुखावलेला कवी सखीच्या भांगात क्रांती पेरण्याची भाषा करतो. एवढेच नाही तर, आजच्या काळात दलित-उपेक्षित समाजासाठी आधुनिक, पायरीचे दगड डोक्यात घालणारा आक्रमक 'नवा कीर्तनकार' आवश्यक असल्याचे मतही मांडतो. या व्यतिरिक्त, 'तेव्हापासून' कवितेत आदिम ठसठस, 'इशारा'मधून लढण्यासाठी सज्ज होण्याचे आवाहन, 'कोंडू चांभार'मध्ये जग बदलले तरी न बदलणारा/ सर्व पातळ्यांवर अपयशी ठरलेला सर्वसामान्य चांभार, 'घरकुल'मध्ये समतेसाठी धडपडणारा जीव, 'तो फकीर सांगून गेला' कवितेत प्रेरणा देऊन जगण्याची शक्ती देणारा फकीर अशी विविध पातळ्यांवरची वर्णने लहू कानडे नोंदवितात. यातून कवीची समकाळाकडे, त्यातील घटिताकडे पाहण्याची विचारदृष्टी आणि पुढे येऊन लढण्याची तयारी प्रकट होते.

सोपे होते. अल्पाक्षरी आणि सहजसंवादित्व हे या संग्रहाचे ठळक वैशिष्ट्य जाणवते.

'टाचाटिभा' या शीर्षक कवितेत कवी माणसाची अतिमहत्त्वाकांक्षा, सवयीचे भोग, अप्पलपोटेपण, सर्वत्र सुरू झालेल्या कत्तली यामुळे झाडांचे वहर झडणे, पाखरांचे गाणे नष्ट होणे अशा प्रतिकूल परिस्थितीचे वर्णन करताना रस्त्याला टाचाटिभा करून सगळ्यांना आधार देऊन प्रवासाला शुभेच्छा देण्याची तयारी करतो. 'साखरेचा वसा'मध्ये कारखानदारीत होणारे शोषण, गेलेले बळी, झिरपणारे रक्त यासाठी शोकसभा होऊन पुन्हा नेहमीप्रमाणे काम सुरू राहील. यातून माणसाची किंमत शून्य झाल्याचे सुचवितो. 'युद्धभूमीच्या आठवणीत' कवीने चार कविता केल्या आहेत. वाट्याला आलेले भोग, जातीयता, विटंबना व आयुष्याला पडलेले डाग या पार्श्वभूमीवर उगवणारा उद्या माझा असेल, हा विश्वास कवीला आहे. 'राखीव जागा'मधून आरक्षणाला विरोध करणाऱ्यांचा कडक समाचार त्यांनी घेतला. 'टाईमबाँब' कवितेतून आईचा दमा, थोरल्या भावाची व्यसने, बालकामगार, मुलगी यातून हृदयाची धडधड त्याला टाईमबाँब वाटू लागते. या व अशा इतरही काही कविता कवीचे वेगळेपण सिद्ध करतात.

**'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व'मध्ये घेतलेली 'टाचाटिभा'ची नोंद :**

रा. ग. जाधव यांनी या कवितासंग्रहातील आणि कानडेंच्या भावजीवनातील स्थित्यंतरं 'पायताणातील ताण, बाण नि आण' या लेखातून सूक्ष्मपणे टिपले आहे. अस्सल देशी परंपरा त्यामध्ये आहेत. कवीचा हा संघर्ष एकट्याचा नसून विसाव्या शतकाच्या अंतिम पर्वाचा महत्त्वाचा संघर्ष आहे. कानडे यांना उत्तम कवितेची नस सापडली असून त्यांनी अधिक जाणिवेने वास्तवाकडे पाहायला हवे, अशी अपेक्षा जाधव सरांनी त्यांच्याकडून व्यक्त केली आहे.

याव्यतिरिक्त, 'विजिगीषु वृत्तीची स्पंदने' (लीला गोविलकर), 'जीवनातील सत्याचा शोध घेणारी वास्तववादी कविता' (मिलिंद कसवे), 'युद्धजन्य दलित अनुभूतीची प्रामाणिक अभिव्यक्ती' (भास्कर जाधव), 'वेदनेचा संयत सूर' (प्रमोद मुनघाटे), 'शोषितांच्या भावजीवनातील सुजाण अभिव्यक्ती' (रवींद्र लागू), 'अतिदलितांच्या सुजाण अस्मितेचे दर्शन' (राजा गायंगी), 'विद्रोहाच्या गाण्याची कहाणी' (लक्ष्मण माने), 'टाचाटिभा : कवितेतील आत्मकथन' (नागनाथ कोत्तापल्ले), 'काळजाला टाके घालणारी कविता' (कल्याणी हर्डीकर), 'आत्मानुभवाचे अंतरंग' (भीमसेन देठे), 'संवेदनांचं पारदर्शक संक्रमण' (जयंत पवार) व काही अभ्यासकांचे लेखही यात आहेत. या लेखांची शीर्षके पाहिली तरी कवितेतील वैशिष्ट्यांची जाणीव वाचकाला सहज होते. काही लेखांमध्ये मांडणीच्या अंगाने उणिवा असल्या तरी कवितेतील आशय समजून केलेले वैविध्यपूर्ण विश्लेषण हे या विभागाचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

**'तळ ढवळताना'मधील कविता :**

लोकवाङ्मय गृहाने सुंदर-सुबक मांडणी व आकर्षक रेखाटने, मुखपृष्ठ यासह ६२ कविता घेऊन १४ एप्रिल २०१२ रोजी पहिली आवृत्ती काढली. हा संग्रह कवीने राम दोतोंडे यांना अर्पण केला आहे. सत्य आणि परखडपणा यावर आधारित या रचना आहेत. दर्जेदार कवितेसाठी बहुश्रुतता व अनुभवविश्व समृद्ध असणे आवश्यक आहे. जे संचित लहू कानडेंकडे आहे. समाजाचं सूक्ष्म चिंतन असलेला हा कवी जीवनाचं- वास्तवाचं भान आणि सम्यक ज्ञान दोन्ही घेऊन आहे. शून्यातून विश्व उभं करताना यशस्वी होताना जी परिवर्तनं त्यांनी अनुभवली. त्याचाही धागा

कवितेतून जागोजागी येतो. ही कविता संवादी आहे, मनाचा तळ ढवळत इतरांच्या मनाला अंतर्मुख करायला लावणारी आहे. कुठेही प्रचारकी थाटात ती वावरत नाही, भाषणबाजीही नाही. थेट आवाहन आहे. केवळ राग व्यक्त करण्यापेक्षा ही कविता मानवी मूल्ये आणि त्याचा सक्षम आविष्कार करते. सध्याच्या युगातील भौतिक सुखाच्या नोंदीही कवितेत अभावानेच येतात, हा जागतिकीकरणाचा आणि मानवाने केलेल्या वैज्ञानिक प्रगतीचा परिपाक आहे. एकीकडे झोपलेल्या मनांना जागं करताना दुसरीकडे परखड शब्दांत खडसावणारी ही रचना आहे. शोषित- वंचितांच्या दुःखाची अनुभूती आपणच घेत असल्याचा अनुभव येथे येतो. अनेक अर्थपूर्ण व नवीन शब्दही कवी या संग्रहातून वापरतात. त्यामुळे काहीशी गूढ वाटणारी ही कविता यंत्रयुगातील शब्दांमुळे आजची वाटते. केवळ वेदना, विद्रोह व आक्रोश या पलीकडे जाऊन नवी दिशा आणि आत्मविश्वास देणारी, सहज संवाद साधणारी कविता म्हणून 'तळ ढवळताना'मधील कविता मोलाच्या आहेत.

**'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व'मध्ये घेतलेली 'तळ ढवळताना'ची नोंद :**

'तळ ढवळताना' हा कानडे यांचा वैशिष्ट्यपूर्ण व वेगळा काव्यसंग्रह असून त्याचे विश्लेषण अनेक जाणकारांनी अत्यंत अभ्यासपूर्णतेने केलेले आहे. विशेषतः एकनाथ पगार (मुक्तीची गीते), प्रकाश मोगले (गावगाड्याचे चित्रण), रावसाहेब कसवे (जागतिक संदर्भ देणारी कविता), उत्तम कांबळे (जागतिकीकरणाच्या सावल्या भेदून आत जाणारी कविता), श्रीपाल सबनीस (दुःखमुक्तीचा ध्येयवाद पेरणारी कविता), केशव राजभोज (सातपुड्यावर फ्लॅश टाकणारी उत्कट काव्यकृती), अनंत राऊत (खाउजाकालीन शोषकांचा दंभस्फोट करणारी कविता), सतीश बडवे (समग्र मानवजातीचा विचार करणारी कविता), अरुण शिंदे (तळ ढवळताना : सामाजिक कविता) या अंगाने केलेली चिकित्सा सखोल आहे. याव्यतिरिक्त रणधीर शिंदे (संवेदनविश्व), माधवी देसाई (आशयसूत्रे), संपत पार्लेकर (अभिव्यक्ती), प्रभाकर बागले (अन्वयार्थ), संजय भास्कर जोशी, सुधाकर शेलार यांनी केलेली मांडणीही अभ्यासपूर्ण आहे.

**समारोप व निष्कर्ष :**

मराठी कविता अलीकडे मोठ्या प्रमाणात लिहिली जात असली तरी त्यातील सामाजिक भान, गुणवत्ता आणि संवादीपण महत्त्वाचे आहे. जगण्याला बळ आणि आशावाद देणाऱ्या मराठी कवितेचा जेव्हा इतिहास लिहिला जाईल, तेव्हा लहू कानडे हे नाव त्यात मोलाचे असेल हे विविध लेखांतून सिद्ध करणारे 'टाचाटिभ्याचे क्रांतिपर्व' हे संपादन आहे. कवितेवरील लेखनाच्या संपादनाची अवघड परीक्षा यानिमित्ताने संपादक डॉ. महेंद्र कदम आणि प्रकाशक बाळासाहेब घोंगडे उत्तीर्ण झाले आहेत.

लहू कानडे यांची कविता आत्मभान देणारी आहे. कळत्या वयात मेहनत करून आयुष्यात स्थैर्य मिळविताना ते समाजाकडे विशेषतः दलित, गोरगरीब आणि कष्टकरी वर्गाकडे तितक्याच संवेदनशीलतेने पाहतात. त्यातून प्रस्थापित व्यवस्थेबद्दलचा आलेला राग ते आक्रमक पद्धतीने 'क्रांतिपर्व'मध्ये व्यक्त करतात. डॉ. आंबेडकरांची विचारसरणी त्यांना जवळची वाटते. समाजाच्या उन्नतीसाठी क्रांतीशिवाय पर्याय नाही म्हणून ते कवितांमधून क्रांतिमार्ग सुचवितात. 'टाचाटिभा' संग्रहातून ते शिक्षक, चांभारकाम करणारे जातबांधव आणि समाजात घडणारे अन्याय-अत्याचार यावर भाष्य करतात. यात लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे यातील निम्म्याअधिक कविता या शिक्षकी भूमिकेतून आलेल्या आहेत. फक्त मनोरंजन किंवा मन मोकळे करणे हा कानडे यांच्या कवितेचा विशेष नाही तर कृतिप्रवण करणे, समाज घडविणे ही शिक्षकी भूमिका येथे प्रभावीपणे प्रकटते. 'तळ ढवळताना'मधून ते अधिक अंतर्मुख होतात. रोखठोक भाषेत अभिव्यक्त होताना कुठेही राग, द्वेष किंवा भाषणबाजी करत नाहीत. संयमित पद्धतीने बदलत्या भोवतालाचा लेखाजोखा मांडतात.

संपादनातील किरकोळ तांत्रिक बाबी आणि शुद्धलेखनाच्या बहुसंख्य चुका टाळल्या असत्या तर कवितेचे हे संपादन दिशादर्शक ठरण्याच्या योग्यतेचे होते. या दोन उणिवा गृहीत धरल्या तरी समकालीन मराठी कवितेच्या समीक्षेवरील हे एक महत्त्वाचे व उपयुक्त संपादन आहे, यात काही शंका नाही. केवळ लहू कानडे यांचीच कविता नव्हे तर समकालीन समग्र दलित कविता, तिची निर्मिती, त्यामागील कारणे, मांडणी, वैशिष्ट्ये आणि उपयुक्तता समजावून घेण्यासाठी हा संदर्भ ग्रंथ निश्चितच महत्त्वपूर्ण आहे.

●

**डॉ. राहुल पाटील**
चलभाष : +९१ ७३८५६५१५२५



अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

# 'मुंबई... बम्बई... बॉम्बे...' एक अवाढव्य प्रतिमा



आजच्या पिढीतील कवी बाळासाहेब लवडे यांचा 'मुंबई... बंबई... बॉम्बे...' हा नवा कवितासंग्रह नुकताच प्रकाशित झाला आहे. बाळासाहेब लवडे यांचा या आधी 'महाद्वार' हा कवितासंग्रह प्रकाशित झाला आहे. मूळचे आळंदी येथील असलेल्या बाळासाहेबांनी 'महाद्वार' या संग्रहात आळंदीचे वास्तव दर्शन घडवणाऱ्या कविता एकत्रित केल्या होत्या. 'मुंबई... बंबई... बॉम्बे...' या संग्रहात त्यांनी मुंबई या महानगराचे त्यांना दिसलेले दर्शन घडवले आहे.

मराठीत महानगरीय कविता फार चांगल्या तऱ्हेने लिहिली गेली आहे. त्यातील बऱ्याच वेळा महानगर म्हणजे मुंबई असे जणू समीकरणच ठरून गेल्यासारखे आहे. नामदेव ढसाळ, नारायण सुर्वे, हेमंत दिवटे, अरुण म्हात्रे, नीरजा अशा अनेक कवी-कवयित्रींनी मुंबईतील अधोलोक, झोपडपट्टी, लोकल्स, गुन्हेगारी, यंत्रवत जीवन अधोरेखित केले आहे. नामदेव ढसाळांनी तर 'गोलपिठा' म्हणजे पुन्हा एकदा वेशीबाहेरचे जगणेच आहे, असा सूर मांडला. नारायण सुर्व्यांनी मुंबईतील कष्टकरी, कामगार, स्त्रिया, बालके, वेश्या यांचे दारिद्र्य आणि दुःखात खितपत पडलेले जीवन कवितेतून समोर आणले. बाळासाहेब लवडे यांची ही कविता मुंबईविषयीच बोलते; परंतु ढसाळ, सुर्वे आदी कवींच्यात आणि बाळासाहेबांच्यात एक मोठा फरक आहे, तो म्हणजे हे सर्व कवी मुंबईस्थित होते किंवा आहेत. बाळासाहेब लवडे हे व्यवसायाच्या-निमित्ताने मुंबईत जात-येत असायचे. वयाच्या १२-१३व्या वर्षापासून ते आळंदीत हारफुले विकण्याचे काम करीत होते. नंतर तेच काम करण्यासाठी त्यांना मुंबईला जावे यावे लागले. ते मुंबईचे रहिवासी नाहीत; परंतु येता जाता त्यांना जी मुंबई दिसली ती त्यांनी कवितेत टिपली. कदाचित, पक्क्या मुंबईकराप्रमाणे त्यांना मुंबईच्या अंतरंगाची सांगोपांग ओळख नसेल; परंतु त्याचबरोबर त्रयस्थाच्या नजरेला जे दिसते ते नेहमी पाहणाऱ्या माणसाच्या नजरेला दिसत नाही. त्या अर्थाने, त्रयस्थ म्हणून त्यांनी घेतलेले मुंबईचे दर्शन हे वैशिष्ट्यपूर्ण असू शकते. मनोगतात ते लिहितात, ''या शहराचा अनुभव स्वानुभव, सहानुभाव या दोन्ही पातळ्यांवर मी घेतला.'' त्यामुळे स्वानुभव आणि सहानुभवातून जे एक मुंबईचे चित्र त्यांच्या अंतःपटलावर उमटले, ते त्यांनी कवितांमधून शब्दबद्ध केले आहे.



'मुंबई.. बंबई.. बॉम्बे...' हे या कवितासंग्रहाचे शीर्षक मोठे अन्वयार्थक आहे. मुंबईमध्ये अनेक धर्म, जाती, वर्ग, प्रदेश, प्रांत, भाषा यांना मानणारे-वागणारे लोक राहतात. त्यामुळे मुंबई म्हणजे विविध संस्कृतींचे एक मोठे कडबोळेच आहे. तिथे देशातील सर्वात श्रीमंत लोकांची डोळे दिपवणारी आलिशान साम्राज्ये आहेत आणि खुराड्यात कोंबलेल्या कोंबड्यांसारखी महादारिद्र्यात बुजबुजलेली भयाण वस्तीही आहे. सुसंस्कृतपणाची झिलई असलेलं जग आहे. तसंच अर्वाच्य शिव्या, गुन्हेगारी यात लिडबिडलेलं जगही आहे. या संग्रहातील कवितांमधून प्रायः महानगरातील अतिसामान्य माणसांचं बेहाल जिणं प्रामुख्यानं आलं आहे. कचरा कस्पटांत काम करता करता इथल्या माणसांची आयुष्यंही कचऱ्या-कस्पटासारखी होऊन जातात. घाणीने भरलेल्या या शहरात राहताना 'जगण्याचे ढिगारे वाढत जातात' असं कवी म्हणतो. 'ठाणे डंपिंग ग्राउंड' या कवितेत लवडे लिहून जातात-

*''जेव्हा कचराच कचरा होतो*
*बाटल्या बिटल्या पिशव्या बिशव्या भरणारी बोटं*
*वळवळतात ढिगातून*
*येणाऱ्या जाणाऱ्या गाड्यांकडे बघत*
*किती नाके दाबावीत कुणी? कुणाची?''*

जिवंत राहण्यासाठी संघर्ष करावाच लागतो, पण त्यासाठी लांडीलबाडी,

फसवणूक, गुन्हेगारी याचा आश्रय घेतला जातो. मग लोकलमध्ये अचानक भेटलेला 'रसूल' आपली कहाणी रंगवून सांगतो आणि तो काम करीत असलेल्या 'अस्पताल'मध्ये 'जाँच' करायला येण्याची गळ घालतो.

वाजूवाला म्हणतो,

*''तुम्हाला काय वाटतं याची कहाणी खरी आहे?''*
*''मी म्हणलं 'म्हणजे,'*
*''रसूल हे नावही खोटं.''*
*''हा किडनी काढून घेणारा रॅकेटवाला''*
*(रसूल चुनाभट्टी)*

अशी लटवणूक मुंबईत पावलोपावली भेटते.

उभ्या आडव्या पसरत गेलेल्या मुंबईचा लवडे उभा आडवा छेद घेतात, तेव्हा त्यांच्या मनःपटलावर या शहराच्या सुसंगत, विसंगत कितीतरी प्रतिमा कोरल्या जातात. या प्रतिमांच्या सावल्या त्यांच्या कवितांमध्ये पडलेल्या आपल्याला दिसत राहतात. मग तो 'सेल्फी धारावीचा' असेल वा 'सायनचा कोळीवाडा', 'लालबागच्या लॉटऱ्या' असतील वा 'कबुतरखाना', 'ससून डॉक' असो वा 'हिरानंदानीचा चौथा मजला' असो. मुंबईतला सतत सुरू असलेला गदारोळ, कल्लोळ, संवेदनशील माणसाला मनाच्या आत आत ढकलत अंतर्मुख करतो.

*'मलाही वाटतं काढावा*
*एक सेल्फी धारावीचा*
*सांगा कोणत्या दुःखाचा सेल्फी काढू?'*

अशा अर्ध-उपरोधिक, अर्ध-करुण शब्दांत कवी प्रश्न विचारतो. 'दुःख किलोवर विकत नाही/ आणि त्याने पोटही भरत नाही,' असे उद्गार त्याच उपरोध आणि करुणेच्या पोटातून येतात. हातात आलेल्या या 'डिजिटल' कॅमेऱ्याच्या साहाय्याने लवडे मुंबईची अशी विविध छायाचित्रं काढतच सुटतात. पुलाखालचे भिकारी, हप्तेबाज, गुंड, गुन्हेगार, दहशतवादी, दलाल, चाकरमाने, कष्टकरी कामगार, वेश्या यांनी व्यापलेली मुंबईची अधोलोकनगरी आणि बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्सची 'सतत ऑनलाईन असणारी, एका क्लिकवर हवे ते मिळवणारी, स्वप्नांचे पंख लेवून जगणारी, रंगबिरंगी, मोहमयी दुनिया, मोठमोठे उद्योगपती, बिल्डर्स, चित्रपट सितारे, श्रीमंतवर्गाची ऐषआरामी दुनिया या दोन जगांमधली भीषण दरी, तफावत, विसंगती लवडे यांच्या मनाला टोचत राहते. अंधार आणि प्रकाशाची ही अन्याय्य वाटणी त्यांना असहनीय वाटते. 'लोकशाहीचे बिल्डर' या कवितेत ते लिहितात,

*''कुणाला हवा तो फ्लॅट दिला की*
*कुणाला निवडणुकीला पैसे दिले की*
*कुणाला गुंड पुरवले की*
*विकत घेता येते लोकशाही.''*

सामान्य माणसं अशी परिस्थितीच्या बुलडोझरखाली चिरडली जात असताना शिवाजी पार्कवरचं स्टेज मात्र सजत धजत राहतं. लाईमलाईटमध्ये झगमगून निघत असतं. 'शिवाजी पार्क' या कवितेत लवडे लिहितात-

*''किती आले किती गेले*
*मेळावे सजले*
*गाजले आपटले*
*उलथले उलथवले*
*रंगीबेरंगी झेंडे फडकले*
*हे मैदान म्हणावे की*
*विकासाचा सांगाडा*
*घोषणांचा पाऊस,*
*रिताच माऊस''*

मुंबईतल्या स्त्रिया हादेखील एक वैशिष्ट्यपूर्ण घटक. स्तर, वर्ग कोणताही असो, मुंबईतली स्त्री ही तिच्या वैशिष्ट्यपूर्णतेनं ओळखू येते. 'वैतून' कवितेत ते म्हणतात-

*''हिंदू-मुसलिम कंदाल हुए बाद*
*मरद जाने के बाद औरत लोगोंको*
*खमक्या होना मंगता है क्या नै?''*

तर 'लोकलमधील वायका' या कवितेत 'तळहातावर शिर घेऊन' निघणाऱ्या बायकांविषयी ते लिहितात-

*''बायका झुंडीने शिरतात*
*डब्यात*
*कोणत्या स्टेशनवर बायकांचीच*
*मोर्चाबंदी असेल नेम नाही.''*
*''वकील, डॉक्टर, इंजिनियर, साहित्यिक*
*सगळ्या हायफाय माणसांच्या चारित्र्य कुंडल्या*
*बायकांजवळ असाव्यात''* (अस्वस्थता)

असं एक सार्वकालिक वास्तव ते सांगून जातात.

या सगळ्या अस्वस्थ, मेंदू बधिर करणाऱ्या 'दर्शनां'मधून कवीच्या मनात माजलेली खळबळ, त्याचा जगावर, माणुसकीवरचा उडालेला विश्वास, 'नाही रे' जगाविषयी त्याला वाटणारी करुणा याचे प्रत्यंतर येते. कवीच्या चक्षुकॅमेऱ्यातून फटाफट काढलेले मुंबई नावाच्या महानगराचे फोटो वाचणाऱ्यालादेखील अस्वस्थ, अंतर्मुख करतात. महानगरे आकाराने अवाढव्य असतात आणि त्यातील समस्या, प्रश्न, दुःखंही तेवढीच अवाढव्य, अवघ्या मानवी जीवनावर विळखा घालून बसणारी असतात याची एक विदारक जाणीव या कविता देतात. एक प्रकारे आजचे सारे समकालीन जगणेच 'मुंबई...बंबई... बॉम्बे...'च्या प्रतिमेत बांधले जाते आणि 'मुंबई'वरच्या असलेल्या या कविता 'मुंबई'च्याच पावलावर पावले टाकीत अवाढव्य महानगरे बनण्याच्या प्रक्रियेतील प्रत्येक शहर, गावावर भाष्य करू लागते आणि अवघ्या मानवजातीच्या जगण्याला व्यापून टाकते.





अनुक्रमणिका

लवडे यांची भाषा या कवितांतील आशयसूत्रांना वळकट करणारी आहे. हिंदीमिश्रित मराठी अशा 'वंवय्या' भाषेत लवडे व्यक्त होतात. मुंबईतला कष्टकरी हीच भाषा वापरतो. गुजराती, पारशी, मराठी, उत्तर प्रदेशी अशा विविध प्रांतांच्या भाषांचं कडवोळं झालेली मुंबईची भाषा या कवितेतील ओळी-ओळींतून भेटते आणि ती मुंबईची यथातथ्य चित्रं रेखाटण्यात मदत करते.

आतल्या अस्वस्थतेला जाग आणणारा 'मुंबई... बंबई.. बॉम्बे...' हा कवितासंग्रह एकदा वाचायलाच हवा असा आहे.

•

अंजली कुलकर्णी
३, विघ्नहर, जयवर्धमान सोसायटी,
बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७.
चलभाष : ९९२२०७२१५८

# साठोत्तरी मराठी कादंबऱ्यांचा पर्यावरणीय जाणिवेतून घेतलेला मर्मग्राही मागोवा



हित्य आणि पर्यावरण यांतलं नातं आपण जाणतोच. साहित्यिकाचं पहिलं प्रकटीकरण जेव्हा झालं, तेव्हापासून हे नातं विकसित होत आलं आहे. एखाद्या लेखक-कवीच्या विकसनासाठीसुद्धा स्वाभाविक पर्यावरणाची आवश्यकता असते. म्हणूनच वाङ्मय आणि पर्यावरण यांच्यातील स्वाभाविक नातेसंबंधाचा शोध घेणं उद्बोधक ठरतं. मानवाचं विकसन जसं होत आहे, तसं त्यांच्यातील हे पर्यावरणाविषयीचं भान अधिकाधिक सूक्ष्म होत आहे. आणि मनुष्यमात्राची ही पर्यावरणविषयक जाणीव व्यामिश्र होत चाललेली आपण पाहू शकतो. प्रगतशील तंत्रज्ञानाच्या ह्या काळात शेतीचे होत चाललेले व्यवसायीकरण, खेडोपाडी पोहोचणारी औद्योगिक क्रांती, लोकसंख्येची प्रचंड वाढ आणि त्यामुळे होत जाणारा निसर्गसंपत्तीचा क्षय या सर्वच कारणांनी पर्यावरणाचे संतुलन विघडत चालले आहे. आणि म्हणूनच आधुनिक युगात पर्यावरण हा एक जागतिक स्तरावरचा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न बनला आहे. या सर्व पार्श्वभूमीवर पर्यावरणाच्या प्रश्नाला केंद्रस्थानी ठेवून नव्या जाणिवेनं त्याचा विचार करण्याची, सामाजिक प्रबोधन करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

डॉ. सुहास पुजारी यांचा 'मराठी कादंबरी : सृष्टी आणि दृष्टी' हा ग्रंथ या कळीच्या प्रश्नाविषयी आपलं नवं वैचारिक चिंतन वाचकांसमोर ठेवतो. ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाची यथार्थता प्रत्येक संवेदनशील वाचकासाठी म्हणूनच तीव्रतेने जाणवत राहते.



दुसऱ्या महायुद्धानंतर विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात मानवाने झपाट्याने प्रगती केली. त्याचे काही चांगले आणि वाईट परिणाम माणसाच्या आणि इतर जीवांच्या जीवनावर झाले. अणुविस्फोट, किरणोत्सार यांचे दुष्परिणाम आपण सारेजण पाहतो आहोत. प्रचंड प्रमाणात निर्माण झालेल्या वायुप्रदूषणाने पर्यावरणाचा तोल ढासळलेला आपण अनुभवतो आहोत. तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे औद्योगिकीकरण वाढले. उदरनिर्वाहाच्या गरजेपोटी खेड्यातील माणूस शहराकडे ओढला जाऊ लागला. आणि साहजिकच खेडी ओस पडू लागली. शहरे प्रदूषणाने व झोपडपट्ट्यांनी वेढली गेली. मानवाच्या जीवनात तंत्रज्ञानाने प्रवेश केल्यापासून आपण पाहतो आहोत की, पाखरं देशांतराला गेली. धरणं-बंधारे बांधल्यानं नद्यांची थारोळी झालीत. वायुप्रदूषणाने झाडांचे, प्राण्यांचे आणि कृमिकीटकांचे वंश नष्ट होत आहेत. प्रचंड लोकसंख्यावाढीतून शहरात माणसांना राहायला जागा नसल्याने डोंगर-टेकड्या भुईसपाट झाल्यात. समुद्रकिनाऱ्यांवरती माणसांनी अतिक्रमण करून निसर्गावर तावाच मिळविला आहे. आणि यामुळे समुद्राच्या किनारपट्ट्या संकोचून गेल्यात. जिथं तिथं माणसांची स्वार्थप्रेरित वुद्धी वोकाळली आहे.

या साऱ्या पर्यावरणाच्या असमतोलाच्या झळा संवेदनशील माणसांना सोसाव्या लागत आहेत. वरचेवर त्याचे पर्यावरणविषयक भान तीव्र होत जाताना विनोबांच्या विधानाचे स्मरण व्हावे. ते म्हणत, "बुद्धीचा सर्वांत मोठा पराभव तिचा स्वार्थासाठी उपयोग होणे हा होय." याची प्रचीती आपण घेत आहोत.

अशा या पार्श्वभूमीवर डॉ. सुहास पुजारींच्या पर्यावरणविषयीच्या नव्या जाणिवेचं जागरण घडवणारं पुस्तक








प्रकाशित होतं आहे, ही एक समाजातील शुभ घटना आहे. हे पुस्तक म्हणजे एका संवेदनशील माणसातल्या लेखकाने पर्यावरणाचा, साठोत्तरी कालखंडातील पर्यावरणाचा अकादेमीच्या चौकटीत केलेला अभ्यास आहे. त्याचे महत्त्व केवळ ग्रंथप्रकाशनापुरते नाही. अभ्यासाची उपयोजित बाजू त्याला अवश्य आहे. तरीदेखील एवढीच ग्रांथिक नोंद घेऊन आपल्याला थांबता येणार नाही. डॉ. सुहास पुजारी हे खरे निसर्गप्रेमी आहेत. यामुळेच या ग्रंथाला एक आत्मीय परिमाण सहजच लाभले आहे. या ग्रंथाचे लेखन निसर्गप्रेमातून झाले आहे, हा या ग्रंथाचा विशेष आहे. ग्रंथातल्या पर्यावरणविषयक प्रश्नाची व्याप्ती ही केवळ ग्रांथिक नाही तर ती मनुष्यमात्राच्या जीवनाशी थेट जोडलेली आहे, हे लेखक जाणून आहे. हे असे सर्वांगांनी जाणल्यामुळेच 'मराठी-कादंबरी : सृष्टी आणि दृष्टी' या ग्रंथानी शास्त्रीय परिभाषेतली मांडणी संवेद्य झाली आहे.

अनुक्रमणिकेतली प्रकरणाची केवळ शीर्षकं पाहा. त्यातलं लेखकाचं पर्यावरणविषयक प्रश्नाचं भान किती व्यापक आहे, ते आपल्याला दिसून येईल.

१. पर्यावरण : स्वरूप आणि समस्या
२. पर्यावरणीय भान : पूर्वाभास
३. साठोत्तरी मराठी कादंबरीतील पर्यावरणीय अनुभवाचे स्वरूप
४. साठोत्तरी कादंबरीतील पर्यावरणीय भान : आविष्काराचे स्वरूप

साहित्य, प्रसारमाध्यमे, सामाजिक व पर्यावरणाशी निगडित संस्था आणि शासन अशा सर्वच स्तरांवरून सुरू झालेल्या 'पर्यावरणीय प्रबोधनयुगाची' साठोत्तरी मराठी कादंबरीतून संवेदनशील नोंद कशी घेतली गेली आहे, ते डॉ. सुहास पुजारींनी सविस्तर तपशिलांसह नोंदवले आहे. ते म्हणतात, ''साहित्यातून पर्यावरणीय प्रबोधनाचे भान प्रकट झाले आहे. तसे समाजाच्या स्तरावरही प्रत्यक्ष कृती व चळवळींच्या स्वरूपातूनही हे भान व्यक्त झाले आहे. पक्षिनिरीक्षण, निसर्गनिरीक्षण, अरण्यनिरीक्षण, गिरीभ्रमण, गिर्यारोहण, दुर्गभ्रमण, जलविहार, जलपर्यटने, नदी, खाड्या व समुद्रसफरी, आकाशनिरीक्षण, तारकादर्शन, नक्षत्रावलोकन, ग्रहणदर्शन, शासन व विविध पर्यावरणप्रेमी संघटना, संस्था यांचे उपक्रम व सर्व प्रसारमाध्यमांकडून होणारे पर्यावरणीय प्रबोधन, वॉल्ट डिस्ने यांचे व्यंगचित्रपट, शिक्षणक्रमात झालेला पर्यावरणशास्त्राचा समावेश, विविध पर्यावरणविषयक चळवळी यांमधूनही पर्यावरणीय प्रबोधनाची जाणीव-ज्योत प्रज्वलित राहिली आहे. त्यातून समाजात पर्यावरणविषयक वास्तव व व्यापक जाणीव उदयास आली. ही जाणीव स्वातंत्र्यपूर्वकाळातील साहित्यातून व्यक्त होणाऱ्या सौंदर्यवादी जाणिवेपेक्षा अधिक व्यापक आहे. ती सौंदर्यग्राही व अद्‌भुतरम्यतेच्या ओढीपुरतीच मर्यादित नसून पर्यावरणाच्या रक्षणाच्या व संवर्धनाच्या विचाराला अधिक परिपुष्ट करणारी आहे.''

मोक्षगुंडम विश्वेश्वरय्या, सुंदरलाल बहुगुणा, डॉ. सलीम अली, जिम कार्बेट, के. सी. श्रॉफ, मारुती चितमपल्ली, मेधा पाटकर, विलासराव साळुंखे, भंवरलाल जैन व अण्णा हजारे यांच्यासारख्यांनी व्यक्तिगत व सामाजिक पातळीवरून पर्यावरण प्रबोधनासाठी केलेले कार्य खूप मोलाचे आहे. हे पर्यावरणीय प्रबोधन सर्व स्तरांवर व्हायला हवे. पर्यावरणातील सर्व घटकांमध्ये निसर्गतः असणारा सहसंबंध पुढे कसा नेता येईल, तो अबाधित कसा राखता येईल, हे सावधपणे पाहिले पाहिजे. साहित्य हे प्रबोधनासाठी एक प्रभावी माध्यम आहे. पर्यावरणीय संस्कार, पर्यावरणीय जाणीवजागृती याकरिता वाङ्मयीन प्रतिसाद फार महत्त्वाचा आहे. निसर्गाच्या भव्यतेचे, त्यातील घटकांच्या सहसंबंधाचे प्रभावी दर्शन साहित्यातून घडले पाहिजे. अशा विचारांतून डॉ. सुहास पुजारी यांनी प्रस्तुत ग्रंथाची सिद्धता केली आहे. ग्रंथलेखनामागचा हा हेतू कुठल्याही संवेदनशील वाचकाला दृष्टीआड करता येण्यासारखा नाही.

सदानंद देशमुखांचे 'बारोमास', सुरेखा शहा यांचं 'जोहड' या कादंबऱ्या पर्यावरणीय भान जागवणाऱ्या प्रातिनिधिक कादंबऱ्या आहेत. वृक्षसंवर्धनाला व पर्यावरणरक्षणाला चालना देणारा 'बारोमास'मधला विचार एका निसर्गप्रेमी शेतकऱ्याचा आहे : 'ज्यांच्या दारी झाडं होती त्यांनी आर्थिक अडचणीला बळी पडून विकली. आधी शेतातली. मग दारातली. खरं म्हणजे झाडांची खरी गरज शिवारालाच. तिथल्या मातीची धूप होऊ नये म्हणून. जमिनीचा पोत टिकून राहावा म्हणून झाडं हवीच.'

'जोहड'मधील पाणीप्रश्न व त्या अनुषंगानं उभालेल्या एका पर्यावरणवादी विचाराच्या कार्यकर्त्याच्या लोकोत्तर कार्याची कहाणी आहे. त्या विषयीचं डॉ. पुजारींचं चिंतन मुळातून वाचण्यासारखं आहे.

प्रवीण बांदेकरांच्या 'चाळेगत' या पर्यावरणाच्या ऱ्हासाचे अस्वस्थ अवकळाचित्र रेखाटणाऱ्या कादंबरीची नोंद डॉ. पुजारींनी खूप जाणतेपणानं घेतलीय. पुजारी लिहितात, 'हत्तींचा कळप गावात घुसल्याचा एक प्रसंग 'चाळेगत'मध्ये चित्रित केला आहे. हत्ती गावात घुसतात आणि शेतकऱ्यांच्या पिकांचे मोठे नुकसान करतात. अशा तक्रारीचा सूर या चित्रणातून व्यक्त झाला आहे. तो कोकणातील कुळवाड्यांच्या, रहिवाशांच्या दृष्टीने न्याय्य असेल परंतु वन्यजीवांवर अन्याय करणारा आहे. पर्यावरणीय विचारांना व एकूणच पर्यावरणीय जाणिवेला तो छेद देणारा आहे.' या मार्मिक नोंदीमुळे वाचकाचे पर्यावरणविषयक भान अधिक तीव्र व उत्कट होते.

साठोत्तरी मराठी कादंबरीतील पर्यावरणीय अनुभव व पर्यावरणीय जाणिवेचा आविष्कार करणाऱ्या 'हिंदू : जगण्याची समृद्ध अडगळ', 'गोतवळा', 'माऊली', 'झाडाझडती', 'पांगिरा', 'राघववेळ', 'मेंढका', 'अरण्यकांड', 'बारोमास', 'जोहड', 'एसईझेड', 'चक्रीवादळ', 'कापूसकाळ', 'चाळेगत'

इ. कादंबऱ्यासंबंधी पर्यावरणीय वास्तवाला कलारूप देण्यात आलेल्या प्रतिभेच्या सामर्थ्याबाबत डॉ. पुजारींनी मार्मिक भाष्य केले आहे.

डॉ. पुजारींनी या ग्रंथात नोंदवलेल्या पर्यावरणाशी जोडलेल्या संज्ञा त्यांच्या निसर्गचिंतनातून जन्मलेल्या आहेत. उदाहरणार्थ - पर्यावरणीय जाणीव/ पर्यावरणीय भान/ पर्यावरणीय वास्तव/ पर्यावरणाचे संस्कृतीकरण/ पर्यावरणीय प्रबोधनयुग/ पर्यावरणीय अनुभव/ पर्यावरणीय संवेदन/ पर्यावरणाविषयीचा प्रेमभाव/ पर्यावरणीय इतिहास. या साऱ्या संज्ञा पुजारींच्या निसर्गावर नितांत प्रेम असल्याच्या द्योतक आहेत.

डॉ. पुजारींचा 'मराठी कादंबरी : सृष्टी आणि दृष्टी' हा ग्रंथ वाचल्यावर वाचकाच्या मनात पर्यावरणविषयक म्हणजेच निसर्गविषयक भावनात्मक चिंतन सुरू होतं : पर्यावरण केवळ मनुष्यमात्राचं नसून साऱ्या जीवमात्रांचं आहे. पर्यावरणीय संवेदन हे प्रादेशिक, प्रांतीय किंवा राष्ट्रीय असं नाही. पर्यावरण म्हणजे केवळ विचार नाही किंवा संकल्पना नाही, जी शासकीय-प्रशासकीय पातळीवरून राबवावी लागते. पर्यावरण आपल्या सर्वांच्या अस्तित्वाशी जोडलेलं आहे. कारण आपण ज्या पंचमहाभूतापासून जोडलेले आहोत ते पर्यावरणच आहे.

प्रस्तुत ग्रंथाची भावगर्भता वसंत आबाजी डहाकेंच्या एका लहानशा कवितेतून किती समर्थपणे व्यक्त झाली आहे ते आपणाला पाहता येईल.

*'झाड तोडायचे, कापायचे*
*लगदा करायचा, कागद बनवायचा,*
*त्यावर लिहायचे, ते छापायचे,*
*मग वाचायचे.*
*एवढा खटाटोप कशासाठी?*
*सरळ*
*झाडच वाचावे!*
*झाड वाचताना*
*मला तुझाही अर्थ*
*उलगडत जातो.*

•

**हेमकिरण पत्की**
अ-४, गजानन अपार्टमेंट,
आसरा सोसायटी, होटगी रोड,
सोलापूर - ४१३००३
चलभाष : ९४०३७६८८९१

---

# रोज जगताना चिमटीतून निसटलेले...



लांना गोष्टी ऐकायला आवडणे यात विशेष काहीच नाही. पण गोष्टीवेल्हाळ असणे आणि कथाकथनाला गर्दी करणे हेही महाराष्ट्राला नवीन नाही. यातूनच फार पूर्वीपासून कथा लिहिल्या आणि छापल्या जातात, त्यांचे संग्रह निघतात; आणि एका टप्प्यावर त्यांच्या आवृत्त्या निघणे थांबल्यावर ४०-४५ वर्षे सातत्याने लेखन करणाऱ्या लेखकांच्या निवडक सदरांच्या लेखांचीही पुस्तके निघतात.

'निवडक' संग्रह निघण्यामागे काही खास उद्देश असतात. काही कथांना, लेखांना पुन्हा पुन्हा वाचण्याचे मूल्य असते. हे लेखन संग्रही ठेवणे, एकूणच तिच्या दस्तऐवजीकरणाचे महत्त्व ओळखणे आणि वाङ्मयाचा वारसा जतन करून पुढच्या पिढीपर्यंत पोहोचवणे... यातूनच अशा निवडक संग्रहांची निर्मिती होत असते. ते करीत असताना संपादक त्या समग्र साहित्याचा आढावा घेतो, टिका-टिप्पणी करतो, वाचकांना मार्गदर्शन करण्याबरोबरच संग्रहातील कथा-लेखांबरोबरच इतरही वैशिष्ट्यपूर्ण साहित्याचा उल्लेख करतो, ज्यामुळे वाचक त्या लेखकाचे हे इतर साहित्यही आपल्या आवडीनुसार वाचण्यास उद्युक्त होतो.




अंदाजे तीन वर्षांपूर्वी मंगला गोडबोले यांच्या लेखनाचा या दृष्टीने विचार करण्यास राजहंस प्रकाशनने सुरुवात केली. आणि त्यांनी ती जबाबदारी डॉ. वंदना बोकील-कुलकर्णी या 'स्त्री-कथात्म साहित्या'च्या विशेष अभ्यासकांवर टाकली.

मंगला गोडबोले या प्रामुख्याने विनोदी लेखिका म्हणून प्रसिद्ध असल्या तरी त्यांचे गंभीर वळणाचे साहित्यही तितक्याच प्रमाणात लिहून प्रसिद्ध झालेले आढळते. शिवाय कित्येकदा रोजच्या जगण्याशी संबंधित असे गंभीर विषय त्या विनोदी पद्धतीने हाताळताना दिसतात. या दृष्टीने त्यांचे साहित्य करमणूक म्हणून पाच मिनिटासाठी हातात घेतले आणि 'विनोद' म्हणून हसून सोडून दिले अशा पद्धतीचे नसते, असे काही नमुन्यादाखल वाचन






करतानाही लक्षात येते. रोजच्या जगण्यात अनुभवाला येणारे किंवा दृष्टीस पडणारे छोटेसे प्रसंग त्यांच्या मनात घर करून राहतात. 'हे असं का असेल', किंवा 'का झालं?' याचा शोध घेण्याच्या मागे मग त्या लागतात. घटना, प्रसंग, पात्रं उभी राहू लागतात. तुकडे जोडता जोडता मग कथा/लेखन कागदावर उतरते. कधी खटकलेल्या गोष्टी, कधी समोर दिसणारे वेगवेगळ्या वयोगटातील, परिस्थितीतील माणसांचे प्रश्न कागदावर उतरत जातात, प्रसिद्ध होतात. 'सायंकाळी एकेमेकी', हा पुण्याच्या परिसरातल्या काही कार्यक्रमांविषयी सांगणारा संग्रहसुद्धा प्रसिद्ध झाला आहे. त्या कार्यक्रमाबद्दल सांगता सांगता त्या अनुषंगानी मंगलाताईंनी जे मांडलं आहे, तेही फार महत्त्वाचे आहे असेच दिसते. शिवाय गेले ४० वर्षे हे लिहीत असताना जीवनातील बदलते प्रश्न, समस्या, त्यांची उकल, वातावरण, बदलणारी बोली भाषा... याची जाणीव वाचकाला होत जाते, पण त्याशिवाय या सर्वांमागील लेखिकेचे बारीक निरीक्षण, क्वचित अभ्यास, त्या त्या लेखातील कथेतील वातावरण यथायोग्य, बिनचूक उभे करणे आणि त्याची परिभाषा जाणणे यामागील कौशल्य लक्षात आल्याखेरीज राहत नाही. मग ते साधे मध्यमवर्गीय घर असो, शाळा, हॉस्पिटल, बँक, सोसायटी किंवा जुना वाडा, अत्युच्च आर्थिक परिस्थितीतील महालसदृश बंगला किंवा कॉर्पोरेट जगतातील सहल, ऑफिस, परिषद किंवा आणखी काही...

मंगलाताईंनी 'अमृतसिद्धी' सारख्या पु. लं.च्या संदर्भातील समग्र साहित्य आणि व्यक्ती-लेखनावरही लिहिले आहे. तो तर फार मोठा ग्रंथच, शिवाय दाजीकाका गाडगीळ यांचे आत्मचरित्र (शब्दांकन) अशा प्रकारचे साहित्यही त्यांच्या नावावर जमा आहे. 'तदेव लग्नम्' सारखे एखादे संपूर्ण मार्गदर्शक पुस्तकही त्यांनी दिले आहे.

इथे विचार केला गेला आहे, तो त्यांच्या विनोदी कथा तसेच गंभीर लेखनाचा... लेख आणि कथांचा.

डॉ. वंदना बोकील-कुलकर्णी यांचा कथा हा जिव्हाळ्याचा विषय. ५-७ स्त्रीवादी लेखिकांच्या कथासाहित्याचा त्यांनी त्यांच्या पीएच. डी.साठी चिकित्सक अभ्यास केला. मंगला गोडबोले यांची दोन पुस्तके आणि 'कथा दीपावली २०१६'चे संपादन त्यांनी केले. आता २०१७च्या दिवाळी अंकांमधून कथा निवडण्याचे काम चालू आहे. साहित्याच्या अभिवाचनाचे ४-५ कार्यक्रम त्यांच्या नावावर जमा आहेत, तसेच कवितांचे कार्यक्रम आखणे, निवेदन करणे असेही कार्यक्रम त्या करतात. ते सहसा रेकॉर्डेड गाणी-कविता यापेक्षा निराळे असतात. एम. ए. (मराठी)ला अध्यापन करण्याचे तसेच पीएच. डी.साठी मार्गदर्शक म्हणूनही त्या काम करतात.

मंगलाताईंचे साहित्य वाचताना त्यांनी पहिल्या फेरीत ऐंशी लेख, कथांची निवड केली होती. त्यानंतर ही संख्या पस्तीसवर आली. जोडीला एक प्रहसनही होते. मग यातून विनोदी लेखन वेगळे काढण्याचे ठरले.

स्त्रियांच्या लेखनाची दखल घेऊन त्यांचे खंड प्रसिद्ध करण्याच्या काळातही विनोदी लेखिका खूप कमी असल्याचे आढळून आले. शिवाय त्या साहित्याला लोकप्रियता लाभली तरी समीक्षा होणे हा प्रकार त्याच्या वाट्याला खूपच कमी प्रमाणात आला. मंगलाताईंच्या लेखनाचे मूल्यमापन वंदना बोकील-कुलकर्णी यांनी अत्यंत प्रेमाने आणि मनःपूर्वक केलेले आढळते.

'विनोदाची वार्ता' यामध्ये त्यांनी लेखिकेच्या विनोदी कथांचे पाच स्वतंत्र गट केले आहेत. ते साधारणपणे लेखनविषयक, भाषेसंबंधी, समाज-संस्कृती-बदल या संदर्भाने आलेले गृहिणीपणातले, नातेसंदर्भातले... अशा आशयानुसार केलेले आढळतात. अशी विभागणी करताना संपादकांनी त्या त्या गटासाठी समर्पक अशी लेखिकेचीच काही वाक्यं निवडली आहेत. त्यासाठी चंद्रशेखर बेगमपुरे यांनी साजेशी चित्रंही काढली आहेत. मुखपृष्ठ मांडणी, नावाच्या अक्षरांचे सुलेखन... मंगलाताईंच्या व्यक्तिमत्त्वासारखेच प्रसन्न मुखपृष्ठ तयार करण्यात त्यांचा मोलाचा वाटा आहे.

असे गट पाडण्यातला मोठा धोका म्हणजे सारखे विषय असणारे लेख पाठोपाठ येणे... इथे मात्र विषय जवळपासचा आहे असे लक्षात येऊन सुद्धा त्याची हाताळणी, मांडणी खूप वेगवेगळ्या पद्धतीने, कधी निरनिराळ्या दृष्टिकोनातून केलेली दिसते.

अशा पद्धतीच्या विनोदी-खिल्ली उडवणाऱ्या, उपहासगर्भ, चेष्टेखोर लेखनासाठी लेखिकेच्या अंगी विलक्षण धाडस असावे लागते. इतकी वर्षे सातत्याने लिहीत राहून त्यात टिकून राहणे हे मंगलाताईंचे वेगळेपण! 'माझ्यासारखी गेंड्याची कातडी असणारी एखादीच!' असे त्या स्वतःच म्हणतात. कारण मुलांच्या वागण्यावर, स्वयंपाकघरातल्या गोष्टींवर, बायकांना तुच्छतेने वागवणाऱ्या पुरुषांवर वक्तव्य करीत असलेल्या लेखांवर ज्या प्रतिक्रिया येतात त्या चटकन लेखिकेच्या आयुष्याशी थेट जोडल्या जाताना दिसतात. मात्र असे अनुभव स्वतःचे असावे लागतात असे नाही, प्रथमपुरुषी निवेदनात ते तसे वाटणे हेच लेखिकेचे कौशल्य असते. त्यामुळेच 'पर्स हरवलेली बाई', 'आडवी रेघ', 'माझा सुपर वुमनायटिस...' हे सगळे वाचताना कितीजणींना ते अनुभव स्वतःचे वाटतात हे कुणी मुद्दाम सांगायलाच नको.

दुसरी लेखिकेची निरीक्षण शक्ती... ही त्यांच्याठायी खूप पूर्वीपासून.. स्वभावाचा भाग म्हणूनच असणार, ज्यामुळे या सर्व लेखनासाठी मुद्देमाल आधी त्यांच्या गाठीशी बांधला गेला आणि मग विचारमंथनातून जे आले ते कागदावर उतरले... हळूहळू सर्वांनाच पटूही लागले.

यातूनच संगणक, दूरभाषा आणि त्याची परिभाषा, इतकेच नव्हे तर तरुणांमध्ये आणि मध्यमवयीन लोकांमध्येही होत जाणारे

बदल, सोयीने ठेवलेले किंवा सोडलेले संस्कार, सवयी, परिस्थितीने होणारे बदल, जागतिकीकरण, मोबाईल-संगणकातली वाढती ॲप्स, त्यांचा वापर आणि एकूणच तरुणांची वृत्ती आणि परिभाषा यांचा अभ्यास लेखिकेकडून घडत गेला असावा.

त्यानुसार विनचूक शेरेबाजी करण्याची त्यांची हातोटी वाखाणण्याजोगी आहे. ज्या गोष्टीची टर उडवायची, तिची पूर्ण माहिती असायला हवी, ही त्यांची या अभ्यासामागची भूमिका.

'माध्यमग्रस्त, सारेच त्रस्त', 'देशी ॲरनला देशी आईचं पत्र', तसेच या पुस्तकात न आलेली 'जिथली वस्तू तिथे' ही कथा या अभ्यासाची ठळक साक्ष देतात.

चाळीस-वेचाळीस वर्षे सातत्याने लेखन करीत असताना त्यांच्या लेखनावरही बरेच लिहिले गेले असणार. परंतु या ठिकाणी संपादिकेच्या प्रास्ताविकाचा विशेष विचार करावासा वाटतो. विनोदाचे प्रकार, मंगलाताईंची वृत्ती, त्यांचा अभ्यास याचे सविस्तर विवेचन यामध्ये आढळते, जे एरवी फार क्वचित वाचायला मिळते. अशा लेखनातून मिळणारा आनंद, त्याचे प्रकार, त्याचे हत्यार बनू न देणे, तरीही विचाराला प्रवृत्त करणे, लेखिकेचे भाषाप्रभुत्व आणि प्रेम, सदर लेखन, विनोदाला मानवणारा लेखनाचा आविष्कार... यावर संपादिकेनी अभ्यासपूर्ण अशी योग्य ती टिप्पणी केलेली या 'निवडक मंगला गोडबोले' या पुस्तकात आढळते.

खेळकर शैलीतले मिश्किल भाष्य करणारे हे विचारप्रवण असे प्रसन्न लेखन उत्तम भाषाविष्कारातून अलगदपणे पुढच्या पिढीपर्यंत पोहोचेल असे म्हणायला जागा आहे.

त्यानंतर दीड-दोन वर्षांत म्हणजे अलीकडेच 'कथायात्रा' हे मंगलाताईंच्या निवडक गंभीर कथांचे संकलन 'नवचैतन्य प्रकाशन'ने प्रकाशात आणले.

विनोदी लेखनामध्ये पु. ल. देशपांडे यांचे निवडक लेखन संग्रहित झाले असले तरी बाकी अशा प्रकारे फारसे काही आढळत नाही. जयवंत दळवी यांनी स्वतःच निवड करून 'निवडक ठणठणपाळ' आकाराला आणले. विनोदी लेखिकांमध्ये दीपा गोवारीकर, पद्मजा फाटक अशी नावे आढळतात. परंतु त्यानंतर निवडक मंगला गोडबोले (विनोदी लेखन) हाच संग्रह या प्रकारातला असावा. कथा-साहित्यासंदर्भात मात्र परिस्थिती उलट आहे. १९३२-३५च्या सुमाराला मोठ्या प्रमाणावर सुरुवात होऊन ना. सी. फडके, वि. स. खांडेकर आणि त्यानंतर पु. भा. भावे, व्यंकटेश माडगूळकर, श्री. व्यं. केतकर, गंगाधर गाडगीळ असे नवकथाकार लिहिते झाले. काही काळानंतर म्हणजेच त्यांचे प्रदीर्घ लेखन झाल्यानंतर ५ कथाकार निवडक शांताराम, नंतरच्या काळात स्वतःच्याच निवडीमधल्या आशा वगे यांच्या कथा, त्यानंतर भारत सासणे, शाम मनोहरांपर्यंत प्रत्येकाचे चाळीसएक निवडक कथासंग्रह संपादित झाले.

मधल्या काळात दिवाळी अंकातील निवडक कथा ग्रंथित करण्याचे काम १९८५-८६ पर्यंत झाले. त्यानंतर तसा प्रयत्न २०१६च्या दिवाळी अंकासंदर्भात करण्यात आला आणि त्या वेळी कथासाहित्य एकदम रोडावल्याचे लक्षात आले. दिवाळी अंक कदाचित तीनशेच्या आसपास आणि कथांची संख्या जेमतेम दोनशे. शिवाय 'कथाश्री'सारख्या निव्वळ कथांना वाहिलेल्या अंकामध्ये मागील २५ वर्षांतील निवडक कथांचे संकलन... एकूण कथांसाठी फारसे चांगले दिवस नसण्याच्या काळात एखाद्या लोकप्रिय आणि दर्जेदार लेखिकेच्या ४०-४२ वर्षांमधील सातत्याने लिहिलेल्या कथांमधून निवडक कथा संग्रहित करणे, त्यासोबत संपादकीय टिपण असणे आणि तेही साकल्याने समग्र साहित्याचा अभ्यास करून लिहिलेले असणे नक्कीच महत्त्वाचे ठरते. साहित्याच्या इतिहासात त्याला मोलाचे स्थान प्राप्त होते.

'निवडक शांताराम' या १९८९ मधल्या कथासंग्रहाला टॅग लावलेल्या फाईल्सचे कल्पक मुखपृष्ठ आढळते. तसे मात्र फारसे इतरत्र दिसत नाही. लेखकांच्या फोटोंचाच वापर सतत होतो. हे कुठेतरी खटकते.

प्रामुख्याने स्त्रीकेंद्री, नायक-नायिकांपेक्षा घटनेला प्राधान्य देणाऱ्या, सर्वसामान्यांच्या जगण्याचा आस्थेने शोध घेत असणाऱ्या १५ कथा या संग्रहामध्ये आहेत.

१५ वर्षांची अजाण मुलगी मृत मुलाला जन्म देते. त्या दुःखापेक्षा या बाळंतपणानंतर माहेरी जायला न मिळता सासरीच जावे लागते, याचे दुःख अधिक होते... अशा झुब्बीची गोष्ट 'बच्चा'!

बागेत संध्याकाळी गर्दी ओसरताना एक मध्यमवयीन स्त्री मुलांच्या झोपाळ्यावर खेळताना दिसायची. तिच्यावरून लिहिलेली गोष्ट 'चांदण्या रात्रीतलं स्वप्न', अगदी सुमार दर्जाची बुद्धिमत्ता असलेल्या जोडप्याने शिक्षणसम्राट पदापर्यंत कशी वाटचाल केली याची कथा 'रस्ता', अभ्यासपूर्ण पेपर वाचण्यासाठी कुठल्याही तयारीविना उभे राहून टाळ्या मिळवत इकडचे तिकडचे बोलणारी, खरेदी अत्यावश्यक म्हणून दोन समविचारी टाळकी जमवून दिल्लीचे आमंत्रणही घेता येण्याजोगे संधान बांधणारी मैथिली ज्यातून उभी राहते ती 'गिरकी', पत्नीच्या आजारपणात मुलीकडे जाऊन राहण्याचा विषयही टाळणाऱ्या 'गोकर्ण' यांनी आश्चर्यकारकरीत्या शेजाऱ्यांना टाकून नंतर घर सोडून तिच्याकडे जाऊन राहण्याचा घेतलेला निर्णय हे सांगणारी 'पर्याय', चाळीस वर्षांत विषय किती बदलत गेले याचा मोठा आलेखच यावरून मांडता येईल. आणखीही विषयवैविध्य मोठ्या प्रमाणात या मोजक्याच कथांमध्ये आढळते. ही विविधता लक्षणीय आहे.

बहुतांशी कथा या स्त्रीकेंद्री, स्त्रियांचे विश्व, स्त्रियांचे मन उलगडून दाखवणाऱ्या आहेत. लेखिकेची भाषा साधी, सोपी आहे. तिला अलंकरण, प्रतिमा-प्रतीकांचा सोस नाही. अत्यंत






उत्स्फूर्तपणे काही ठिकाणी 'अंधारात अचानक बैलाचा डोळा चमकून जावा, तसा विचार मनात चमकून जातो', 'नव्याने उभारलेल्या बुजगावण्याला भिणारं पाखरू त्याचं वेगडीपण लक्षात येताच धिटाईने त्याच्या कडेखांद्यावर बसावं तसंच तिचंही भीमप्पाबद्दल झालं', अशा वाक्यांनी कथेचे वातावरण अधिक गडद होण्यास मदत होते. सहज आणि समजूतदार निवेदन अनेकदा संवादांचा आधार होते. मोजकेच संवाद पात्रांमधील नातेसंबंध ठळक करून जातात.

मंगलाताईंच्या लेखणीची अशी अनेक वैशिष्ट्ये या कथासंग्रहातून सहज उलगडतात. अशा निवडक संग्रहातून लेखिकेची सर्व वैशिष्ट्ये जाणवायलाच हवीत. तोच तर त्यामागचा हेतू असतो. मंगलाताईंच्या लेखणीतून चिमूटभर वाटणारे अनुभव विश्वव्यापी अनुभूती देऊन जातात! शिवाय संपादिका आपल्या लेखणीतून हे सर्व छान उलगडूनही दाखवते. अशी प्रस्तावना मार्गदर्शक ठरते.

•

**स्वाती कर्वे**
चलभाष : ९८२२०१९६६८

# उत्साहाचा झरा अनुभवताना

हाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे या गेली ११३ वर्षे साहित्यक्षेत्रात कार्यरत असलेल्या साहित्यातील आद्य संस्थेत आपल्या जीवनातील अनेक वर्षं विविध महत्त्वाच्या पदांवर काम केलेले सर्वांचे परममित्र असलेले राजा फडणीस यांचा नुकताच सहस्रचंद्रदर्शन सोहळा पुण्यात मान्यवरांच्या उपस्थितीत साजरा झाला. या 'सहस्रचंद्रदर्शन' सोहळ्याच्या निमित्ताने 'पुष्पक प्रकाशना'च्या वतीने प्रकाशक श्री. ह. ल. निपुणगे यांनी 'उत्साहाचा वाहता झरा' हा देखणा ग्रंथ प्रकाशित केला आहे. प्रामुख्याने दोन भागांत या ग्रंथाची मांडणी करण्यात आली आहे. पहिल्या भागात स्वतः राजा फडणीस यांनी जीवनप्रवासातल्या काही महत्त्वाच्या कार्याबद्दल अभिरुचिसंपन्न लेखन केले आहे. त्यात दिवाळी अंकाचा संपादक, प्रकाशक, विक्रीकर सल्लागार आणि मसाप कार्यकर्ता म्हणून केलेल्या कामावर प्रकाश टाकला आहे. हा पहिला भाग त्यांच्या भावपूर्ण शैलीमुळे अतिशय वाचनीय झाला आहे. या ग्रंथाच्या दुसऱ्या भागात राजा फडणीस यांच्यावर नितांत प्रेम करणाऱ्या प्रतिभावंतांनी केलेल्या लेखनाचा समावेश आहे. अतिशय अभ्यासपूर्ण आणि ललितांगाने केलेले हे लेखन राजा फडणीस या व्यक्तीचं जीवनदर्शन घडविताना त्यांच्या अंतरंगातलं भावदर्शनही घडवण्यात यशस्वी झालं आहे. म्हणूनच या ग्रंथाला वेगळं महत्त्व प्राप्त झालं आहे. 'उत्साहाचा वाहता झरा' या ग्रंथात ज्येष्ठ कथाकार राजेंद्र बनहट्टी, ज्येष्ठ समीक्षक डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, प्रसिद्ध लेखक, वक्ते आणि मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रकाशक शरद गोगटे, डॉ. चं. प्र. पांढरीपांडे, ज्येष्ठ ग्रामीण साहित्यिक रा. रं. बोराडे, परममित्र ना. ज. नाईक, ह. ल. निपुणगे, डॉ. सु. प्र. कुलकर्णी, नंदकिशोर बजाज, ॲड. मुरलीधर उत्तरवार, चित्रकार नाना जोशी, प्रकाशक अनिल मेहता आणि स्व. रत्नाकर कुलकर्णी यांच्या अभ्यासपूर्ण लेखांचा समावेश केलेला आहे. प्रत्येक लेखकाने राजा फडणीस यांच्या जीवनातल्या विविध महत्त्वपूर्ण पैलूंचा परामर्श घेतलेला आहे. हा ग्रंथ एका सामाजिक आणि साहित्यिक भान आणि जाण असलेल्या निष्ठावंत व्यक्तीचा एक महत्त्वपूर्ण दस्तऐवज आहे.



श्री. राजा फडणीस यांचा जन्म पिताश्री रामाचार्य अवधानी आणि मातोश्री पद्मावती अवधानी यांच्या पोटी झाला असला तरी दत्तक गेल्यामुळे दत्तक वडील श्री. दिगंबरपंत फडणीस आणि दत्तक आई सरस्वतीबाई फडणीस यांचे पुत्र म्हणूनच समाजात ओळखले जाते. राजा फडणीस यांना त्यांचे समकालीन मित्र 'राजाभाऊ' म्हणतात. राजाभाऊ म्हणजे उत्साहाचा व चैतन्याचा मूर्तिमंत वाहता झरा आहेत. कंटाळा हा शब्द त्यांच्या शब्दकोशात नाही. वयाच्या २०व्या वर्षापासून आजतागायत ते सातत्याने कार्यरत आहेत. सतत काम करीत राहणे त्यांना नेहमी आवडते. वर्तमान जगण्यात मिळालेला प्रत्येक क्षण ते आनंदात जगतात. प्रत्येक क्षण अनुभवतात. त्यामुळे ते सदैव ताजेतवाने असतात. त्यांची आनंदानं जगण्याची ही वृत्तीच त्यांना या वयातही चिरतारुण्य देत आली आहे.

राजा फडणीस यांच्या जीवनाची कहाणी तशी अतिशय करुण आहे. दत्तक विधानानंतर एका वर्षभराच्या आतच त्यांच्या दत्तक आईचं निधन झालं. फडणीस घराण्याच्या इस्टेटीचा ताबा त्यांच्या आजीने घेतला. त्या वेळी राजा अवघे सात वर्षांचे होते. राजाने नळदुर्गला राहावे अशी आजीची इच्छा होती. पण ती इच्छा झुगारून जनक पिता रामाचार्यांनी शिक्षणासाठी राजाला पुण्याला पाठविले. राजानं खूप शिकावं अशी त्यांची इच्छा होती. नुसत्या नशिबानं मिळालेल्या इस्टेटीत त्यांना रस नव्हता. राजानं स्वतःच्या कष्टावर नशीब काढावं, स्वतःच्या हिमतीवर इस्टेट करावी या निर्धारानं राजाला ते पुण्यात घेऊन आले. दत्तक गेलेल्या राजाला पुन्हा अवधानींच्या







अनुक्रमणिका

घरी यावं लागलं. औंट घटकेची श्रीमंती संपली. फक्त दत्तक घराण्याचं फडणीस हे नाव तेवढं कायमचं शिल्लक राहिलं. पुण्यात आल्यावर त्यांनी आपलं बी. कॉम. पर्यंतचं शिक्षण पूर्ण केलं. पदवीधर होताच पुणे ट्रेझरी येथे नोकरी केली. पुढे ते विक्रीकर अधिकारी झाले. तिथला भ्रष्टाचार पाहून तिथं त्यांचं मन रमलं नाही. पुढे त्यांनी स्वतंत्रपणे विक्रीकर सल्लागार म्हणून व्यवसाय सुरू केला. विक्रीकर कायद्याचे सखोल ज्ञान प्राप्त केले. त्यात त्यांना प्रचंड यश प्राप्त झाले.

१९८२ साली महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या 'कोषाध्यक्ष' या महत्त्वाच्या पदावर ते बिनविरोध निवडून आले. मसापच्या कामात रस घेऊन जीव लावून काम केले. मसापची आर्थिक बाजू वळकट करण्याचा निर्धार केला. सभासद संख्या प्रचंड वाढवली. मसापत्रिकेच्या निर्मितीत सुधारणा केली. अनेक जाहिराती मिळवून पत्रिकेला स्थैर्य प्राप्त करून दिले. राजा फडणीस हे नाव साहित्यजगतात लोकप्रिय झाले. एक प्रकाशक, एक संपादक आणि मसापचे पदाधिकारी या नात्याने त्यांनी केलेले काम खूप महत्त्वपूर्ण ठरले. त्यांच्या उत्तम कार्यामुळेच ते साहित्यिकांच्यामध्येही सर्वप्रिय बनले. राजा फडणीस आपल्या स्वभावामुळे 'राजामाणूस' म्हणूनच ओळखले जाऊ लागले. भेटलेल्या प्रत्येक माणसाला प्रेम देण्याचा त्यांचा स्वभाव सर्वांना आपलासा वाटू लागला. त्यांनी कधीच कोणाचा द्वेष केला नाही. उलट मनाची उदारता प्रत्येकाने अनुभवली.

या ग्रंथात त्यांच्या कार्याचा जसा वेध घेतला आहे, तसा त्यांच्या स्वभावाचाही वेध घेतला आहे. प्रा. मिलिंद जोशी लिहितात- राजाभाऊंचा सर्वांत भावणारा गुण म्हणजे त्यांचा जीवनविषयक रसरशीत दृष्टिकोन. राजाभाऊंचे वाचन अफाट आहे. साहित्यापासून अर्थशास्त्रापर्यंत आणि युद्धशास्त्रापासून परराष्ट्रनीतीपर्यंत त्यांना सगळ्या गोष्टी ज्ञात असतात. दिवाळीत जवळपास पन्नास-शंभर दिवाळी अंक विकत घेऊन ते वाचतात. कथा हा त्यांचा आवडता वाङ्मयप्रकार आहे. कथा वाचून त्यावर सविस्तर चर्चा करणे हा त्यांचा आवडता छंद ते निष्ठापूर्वक जोपासतात. राजाभाऊ आज सर्वार्थाने तृप्त आहेत. जे वाट्याला आले ते आनंदाने स्वीकारले. नियतीने दिलेल्या भोगवट्याची खंत नाही. पदरात पडलेले प्रत्येक दान ते आनंदाने स्वीकारतात.

या ग्रंथात आपलं मनोगत मांडताना राजाभाऊ म्हणतात, ''आता आयुष्याची संध्याकाळ झाली आहे. काळरात्र कधीही येऊ शकते. पण मला त्याची चिंता नाही. माझी खेळी खेळून पूर्ण झाली आहे. नवीन काही मिळवण्याची इच्छा राहिली नाही. मात्र एक खरे आहे, ही खेळी मी अत्यंत प्रामाणिकपणे, कुणालाही न दुखावता माझ्या मनाला पटेल या पद्धतीनेच खेळली आहे, याचा मला सार्थ अभिमान आहे. जगात भरपूर दुःखं आहेत. त्या दुःखासाठी आपण सुतकी चेहरा करून बसलो तर ती कमी होणार नाहीत. आपण आपली दुःखं गोंजारत बसायचं नाही. दुःखाचे फाजील लाड करायचे नाहीत.'' आपलं सारं दुःख बाजूला ठेवून जो दुसऱ्यांच्या सुखासाठी जगतो, तोच खरा माणूस असतो. अशा माणसांना खूप काही सोसावं लागतं. स्वतःच्या हृदयावर स्वतःच्या हातांनी घणाचे घाव घालावे लागतात. त्याशिवाय इतरांना आनंद देता येत नाही. स्वतःच्या वेदना पचवून जे दुसऱ्यांना आनंदी करतात, त्यांच्याच जीवनवेलीवर आनंदाची सुगंधी फुले उमलत असतात. जो भोगतो, अनुभवतो, इतरांना चांगलं काही देऊ शकतो, तोच स्वतःच्या जीवनात आनंदाची निर्मिती करू शकतो. आनंदाचे हिरवेगार झाड बनून राजाभाऊ जीवनभर समाजासाठी काम करीत राहिले. हेच त्यांच्या जीवनाचं प्रवाहीपण उत्साहाच्या झऱ्यामध्ये परिवर्तित झालेलं आहे.

भोवताली माणसं कमी नाहीत. जिकडं बघावं तिकडं माणसंच माणसं दिसतात. शहरात गर्दी मावत नाही. खेड्यातही गर्दी मावत नाही. भोवताली माणसांची गर्दीच गर्दी. माणसाला चेहरा असतो, गर्दीला चेहरा नसतो. चेहरा हरवून माणसं गर्दीच्या महापुरात वाहत जाताना आपण रोज पाहतो, अनुभवतो. गर्दीही कळत नाही आणि माणूसही समजत नाही. वाऱ्याच्या वेगाने आयुष्य धावत आहे. आयुष्य पाण्यासारखं वाहत असतं. जीवनाचा एक सुंदर प्रवाह तयार होतो. या प्रवाहासाठी नदीसारखे काठ असतात. तरंग असतात. अडथळे असतात. अडथळ्यांना पार करून वाहत राहते आणि स्वतः निर्मळ होते त्यालाच तर नदी म्हणतात. या निर्मळ नदीच्या काठावर अनेक पशू, पक्षी, माणसंही येतात. नदीचं पाणी पितात. नदी मात्र कोणाचा भेद करत नाही. तू माझं पाणी पिऊ नको, असं कुणाला म्हणत नाही. नदीला सगळेच समान असतात. म्हणून नदी समतेचं गाणं गाऊ शकते. नदीचं हे गाणं माणसाच्या जगण्याचा आदर्श असायला हवा. हा आदर्श राजा फडणीस नावाच्या राजा माणसात अनुभवायला मिळतो, म्हणूनच राजाभाऊंना जीवन आणि जीवनाचा अर्थ समजू शकला.

आजवरच्या आयुष्यात खूप माणसं त्यांना भेटली. प्रत्येक माणसाचा अनुभव वेगळाच होता. राजा फडणीस माणूस म्हणून आदर्श जीवन जगले आहेत. त्यांच्या आतला भला माणूस खूप मोलाचा आहे. या माणसाच्या हृदयातला माणूसप्रेमाचा झरा त्यांनी सतत जिवंत ठेवला. आतला माणुसकीचा झरा ज्याला सांभाळता येतो, तोच समाजात चांगला माणूस म्हणून ओळखला जातो. माणूस म्हणून हृदयातलं भलेपण सांभाळणारे राजा फडणीस म्हणून जीवनाला सुंदर बनवण्यात यशस्वी झाले आहेत.

राजा फडणीस नावाच्या या उत्साही वाहत्या झऱ्याचं मोठेपण यातच आहे. जीवनाची सुंदरता अनुभवणं हेच खरं प्रत्येकाचं ध्येय असलं पाहिजे. अशी सुंदर जीवनाची धनी असलेली माणसं खूप कमी भेटतात. अशीच माणसं संस्कृती टिकवतात. अशीच माणसं माणूसपणाला, नात्याला आणि जगण्याला श्रीमंत करतात. राजा फडणीस जीवनाला श्रीमंती देणाऱ्या माणसांतले एक आहेत. अशा माणसाचा समग्र जीवनपट या ग्रंथात वाचायला, अनुभवायला मिळतो. वाचकांनाही श्रीमंतीचा अनुभव देण्याचं सामर्थ्य 'उत्साहाचा वाहता झरा' या ग्रंथात आहे. म्हणूनच प्रत्येकाने उत्साहाचा हा झरा अनुभवलाच पाहिजे.

●

**उद्धव कानडे,** कार्यवाह, म.सा.प., पुणे
चलभाष : ९८९०६५२७२३









कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे मुख्य शाखा कार्यवृत्त नोंद

## दि. १ ऑक्टोबर २०१८ ते ३१ डिसेंबर २०१८

**१. दि. २६ सप्टेंबर २०१८ : एक कवी एक कवयित्री :**
या उपक्रमांतर्गत डॉ. नीलिमा गुंडी व अजय कांडर यांचे काव्यवाचन झाले. उद्धव कानडे व अ‍ॅड. प्रमोद आडकर यांनी त्यांच्याशी संवाद साधला. मान्यवरांच्या हस्ते केशवसुत व बहिणाबाईंच्या प्रतिमेस फुले अर्पण करण्यात आली.

**२. जाहीर सत्कार :** यवतमाळ येथे होणाऱ्या ९२व्या अ. भा. म. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी डॉ. अरुणा ढेरे यांची निवड झाल्यानिमित्त प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते जाहीर सत्कार झाला. डॉ. नीलिमा गुंडी व उल्हास पवार उपस्थित होते.

**३. दि. ३ ऑक्टोबर ते ६ ऑक्टोबर २०१८ :** पुणे बुक फेअर व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या सहकार्याने हे कार्यक्रम झाले.

**दि. ३ ऑक्टोबर २०१८ :** रोजी सकाळी ११ वा. ९१व्या अ.भा. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख व विभागीय आयुक्त डॉ. दीपक म्हेसेकर यांच्या हस्ते गणेश कला क्रीडा केंद्रात भरवलेल्या पुस्तक प्रदर्शन व विक्रीचे उद्घाटन झाले. दोघांनी आपले विचार मांडले. या वेळी संयोजक पी.एन. आर. राजन, कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी व समन्वयक कार्यवाह दीपक करंदीकर उपस्थित होते.

**दि. ४ ऑक्टोबर २०१८ :** डॉ. आशुतोष जावडेकर यांची मुलाखत आदित्य दवणे यांनी घेतली. श्री. राजन, प्रा. मिलिंद जोशी, दीपक करंदीकर उपस्थित होते.

**दि. ५ ऑक्टोबर २०१८ :** 'शरद जोशींना समजून घेताना' या विषयावर 'शरद जोशी-शोध अस्वस्थ कल्लोळाचा' या पुस्तकाच्या लेखिका वसुंधरा काशीकर यांच्याशी भक्ती हुबळीकर यांनी संवाद साधला. एका वेगळ्या विषयावरची ही मुलाखत फारच उल्लेखनीय झाली. श्री. राजन, प्रा. मिलिंद जोशी, दीपक करंदीकर उपस्थित होते.

**दि. ६ ऑक्टोबर २०१८ :** गोल्डन मेमरीज प्रस्तुत 'तिची गाणी' स्त्रियांच्या भावविश्वाचा सांगीतिक प्रवास हा कार्यक्रम सादर झाला. चैत्राली अभ्यंकर, स्नेहल दामले, राजेंद्र हसबनीस, प्रसन्न बाम, आदित्य आपटे, हेमंत वाळुंजकर या कलावंतांनी सहभाग घेतला. या वेळी श्री. राजन, प्रा. मिलिंद जोशी, दीपक करंदीकर उपस्थित होते.

**४. दि. ३ ऑक्टोबर २०१८ :** 'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमांतर्गत पुण्यातील सिंहगड स्प्रिंगडेल इंग्रजी माध्यमाच्या शाळेच्या विद्यार्थ्यांसमोर लेखक सुहास बारटक्के यांचा संवाद झाला. या वेळी समन्वयक माधव राजगुरू व प्रा. मिलिंद जोशी उपस्थित होते.

**५. दि. ८ ऑक्टोबर २०१८ : गदिमा जन्मशताब्दीवर्ष :**
'पुत्र सांगती...' या विषयावर श्रीधर, आनंद व शरतकुमार माडगूळकर या तीन बंधूंची मुलाखत अरुण नूलकर यांनी गदिमा जन्मशताब्दी वर्षानिमित्त घेतली. रसिकांचा भरपूर प्रतिसाद मुलाखतीस लाभला. परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे हे नाट्य परिषद, पुणे शाखेवर निवडून आल्यानिमित्त प्रा. मिलिंद जोशी व सुनीताराजे पवार यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला.

**दि. १३ ऑक्टोबर २०१८ : 'कविता दुर्गेच्या' कवयित्रींचे कविसंमेलन :**
मसाप व साहित्यदीप तर्फे प्रतिभा शाहू मोडक व आमदार प्रा. मेधा कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन घेण्यात आले. अंजली कुलकर्णी, मंदाकिनी गोडसे, आश्लेषा महाजन, भारती पांडे, कांचन खेराटकर, वर्षा तोडमल, स्वाती यादव, प्रतिभा पवार, मीनाक्षी नवले, ज्योती सरदेसाई, ऋचा कर्वे, वंदना लोखंडे, दीपाली दातार या कवयित्रींना आपल्या कविता सादर केल्या.

**७. दि. १५ ऑक्टोबर २०१८ : वाचन प्रेरणा दिन :**
मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी व कार्यवाह माधव राजगुरू यांनी न्यू इंग्लिश स्कूलच्या विद्यार्थ्यांशी वाचन प्रेरणा दिनानिमित्त संवाद साधला.

**८. दि. १५ ऑक्टोबर २०१८ : जाहीर सत्कार :**
महाराष्ट्र साहित्य परिषद, अखिल भारतीय मराठी नाट्य परिषद, पुणे शाखा व अ. भा. चित्रपट महामंडळ या तीन संस्थांच्या वतीने डॉ. मोहन आगाशे यांचा विष्णुदास भावे गौरव पदक जाहीर झाल्यानिमित्त डॉ. जब्बार पटेल यांच्या हस्ते भव्य सत्कार करण्यात आला. या वेळी नाट्य परिषदेचे नवनिर्वाचित कार्यकारिणी तसेच चित्रपट महामंडळाचे मेघराज राजेभोसले व पुणे शाखेचे दीपक रेगे, तसेच मसापचे प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, उद्धव कानडे, दीपक करंदीकर, डॉ. अरविंद संगमनेरकर व जयमाला इनामदार इत्यादी उपस्थित होते. प्रकाश पायगुडे, मिलिंद जोशी, डॉ. मोहन आगाशे, डॉ. जब्बार पटेल यांची यथोचित भाषणे झाली. याच वेळी नवनियुक्त अध्यक्ष मेघराज राजेभोसले यांचा सत्कार डॉ. जब्बार पटेल यांच्या हस्ते झाला. कार्यक्रमास सिनेनाट्य व साहित्यक्षेत्रातील अनेक नामवंत उपस्थित होते.

**९. दि. २५ ऑक्टोबर २०१८ : विशेष कार्यक्रम :**
कै. मोरेश्वर नांदूरकर यांच्या स्मरणार्थ त्यांच्या परिवारातर्फे



अनुक्रमणिका







मसाप, पुणे नगर वाचनमंदिर व पुणे मराठी ग्रंथालय या तिन्ही संस्थांना जुने दुर्मीळ ग्रंथ भेट देण्यात आले. या वेळी श्रीमती नांदूरकर, शैलेश व योगेश नांदूरकर व नांदूरकर कुटुंबीय व 'रसिक साहित्य'चे संबंधित उपस्थित होते. योगेश यांनी या कृतीमागचा उद्देश सांगितला, शैलेश यांनी संदेशपर पत्रवाचन केले. ग्रंथव्यवहारातील मित्र श. ज. मेढेकर यांनी नांदूरकरांच्या आठवणी सांगितल्या. प्रा. मिलिंद जोशी, सुनीताराजे पवार, प्रकाश पायगुडे हे उपस्थित होते. प्रा. मिलिंद जोशी, डॉ. अनुजा कुलकर्णी व श्री. मराठे यांनी ग्रंथ स्वीकारले व मनोगते व्यक्त केली.

**१०. दि. २८ ऑक्टोबर २०१८ : गझल मुशायरा :**

मसाप व ब्रह्मकमळ साहित्य समूह, मुंबई यांच्या संयुक्त विद्यमाने राज्यस्तरीय गझल मुशायरा आयोजित केला गेला. अध्यक्षस्थानी गझल गायक सुधाकर कदम व दीपक करंदीकर होते. वंडा जोशी यांनी सूत्रसंचालन केले. निशब्द देव, आनंद पेंढारकर, विश्वास कुलकर्णी, एजाज शेख, प्रशांत पोरे, आकाश सावंत, विजया टाळकुटे, विशाल राजगुरू आणि दीपक करंदीकर यांनी गझल सादर केल्या. नरेंद्र गिरीधर यांनी मुशायऱ्याचे संचालन केले. विश्वास कुलकर्णी यांनी आभार मानले. श्रोत्यांची उत्स्फूर्त दाद या मुशायऱ्याला मिळाली.

**११. दि. २६ ऑक्टोबर २०१८ : कै. द. वा. पोतदार स्मृतिपुरस्कार वितरण समारंभ :**

कविता भालेराव यांनी लिहिलेल्या 'मराठ्यांचा इतिहास-ग्रंथसूची' या ग्रंथाला डॉ. राजा दीक्षित यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आला. या वेळी पोतदारांच्या स्नुषा शुभलक्ष्मी पोतदार उपस्थित होत्या. डॉ. गणेश राऊत व महेश तेंडुलकर यांची परीक्षण समिती होती. पैकी डॉ. राऊत यांनी परीक्षकांचा दृष्टिकोन विषद केला. डॉ. राजा दीक्षित, कविता भालेराव व सुनीताराजे पवार यांची उचित भाषणे झाली.

**१२. दि. ३१ ऑक्टोबर २०१८ : कै. विद्याधर पुंडलीक पुरस्कार वितरण :**

अमेय दक्षिण.दास यांनी लिहिलेल्या 'अगम्य आणि द कॅन्सस' या पुस्तकाला भारत सासणे यांच्या हस्ते पुंडलीक पुरस्कार देण्यात आला. अमेय यांच्या वडिलांनी हा पुरस्कार स्वीकारला. दीपक रेगे व विनिता पिंपळखरे हे परीक्षक होते. विनिता पिंपळखरे यांनी परीक्षकाची भूमिका मांडली. भारत सासणे यांनी आपले विचार मांडले. रागिणी पुंडलीक आणि पुंडलीक कुटुंबीय उपस्थित होते. साहिल पुंडलीक याने पसायदान सादर केले. वंडा जोशी यांनी अमेय दक्षिणदास यांचे मनोगत वाचून दाखविले.

**१३. दि. १ नोव्हेंबर २०१८ : कै. योगिनी जोगळेकर** स्मृतिदिनानिमित्त मसाप व काव्यशिल्प, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने काव्यशिल्पच्या कवी सभासदांचे बहारदार काव्यवाचन झाले. सुमारे ३५ कवींनी आपल्या कविता सादर केल्या. या वेळी काव्यशिल्पचे अध्यक्ष शिवाजी उराडे, सचिव गीता पुजारी, मार्गदर्शक दीपक करंदीकर व मनोहर सोनवणे व मसापचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे उपस्थित होते. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले.

**१४. दि. २६ नोव्हेंबर २०१८ :** कविसंमेलन : मसाप व अक्षरभारती, पुणे यांचे संयुक्त विद्यमाने म. जोतिबा फुले अभिवादन कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. डॉ. अविनाश आवलगावकर अध्यक्ष होते. प्रा. मिलिंद जोशी, डॉ. प्रा. अविनाश सांगोलेकर व माधव राजगुरू यांची भाषणे झाली. कविसंमेलनात उद्धव कानडे, दीपक करंदीकर, मीरा शिंदे, वि. दा. पिंगळे, वैशाली मोहिते, विजय लोंढे, अपर्णा कडसकर, नितीन चंदनशिवे, अनिल वाटेकर, डॉ. उज्वला हातागळे, अण्णा घगाटे, संतोष ससाणे या कवींनी सहभाग घेतला. रूपाली अवचरे यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. आवलगावकर यांनी कविता सादर केल्या व अध्यक्षीय समारोप केला.

**१४. दि. २७ नोव्हेंबर २०१८ : कै. अहिताग्नि शं. रा. राजवाडे स्मृतिदिन :**

ज्येष्ठ रंगकर्मी सुषमा देशपांडे यांची मुलाखत शैला मुकुंद यांनी घेतली. गायत्री राजवाडे यांनी राजवाडे संकेतस्थळावरची 'फ्रेंच राज्यक्रांती' संबंधीचे फोटो व अपडेट माहिती सांगितली.

**१५. दि. २९ नोव्हेंबर २०१८ : कै. कवी माधव ज्युलियन स्मृतिदिन :**

परिषदेतर्फे उर्दू मुशायरा घेण्यात आला. व्यासपीठावर प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कार्यवाह दीपक करंदीकर उपस्थित होते. 'श्यामलेस' या कवी माधव ज्युलियन यांनी १०० वर्षांपूर्वी लिहिलेल्या मराठी गझलेचे वाचन व माधव ज्युलियन यांच्या विषयीची माहिती दीपक करंदीकर यांनी दिली. विनोश सक्सेना, शिख पाचौली, आरोही श्रीवास्तव, जव्वाद सय्यद, प्रशांत कात्यायन व कमल वर्मा यांनी आपल्या हिंदी उर्दू गझला बहारदारपणे सादर केल्या. रसिकांचा प्रचंड प्रतिसाद मिळालेल्या या मुशायऱ्याचे तितकेच बहारदार सूत्रसंचालन कमल वर्मा यांनी केले.

**१७. दि. ४ डिसेंबर २०१८ : कै. रवींद्र भट पहिला स्मृतिपुरस्कार वितरण सोहळा :**

श्रीमती कुमुदिनी भट यांनी दिलेल्या देणगीतून परिषदेचे माजी पदाधिकारी व श्रेष्ठ साहित्यिक कवी कै. रवींद्र भट यांच्या नावाने प्रथम पुरस्कार ज्येष्ठ साहित्यिक डॉ. अशोक कामत यांना माजी राज्यपाल श्रीनिवास पाटील यांच्या हस्ते देण्यात आला. या वेळी विश्वस्त उल्हासदादा पवार उपस्थित होते. हा प्रथम पुरस्कार संतसाहित्यविषयक कार्य करणाऱ्या डॉ. अशोक कामत यांनी स्वीकारला. डॉ. अशोक कामत, श्रीनिवास पाटील, उल्हासदादा व कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांची यथोचित भाषणे झाली.

●

**प्रकाश पायगुडे**
(प्रमुख कार्यवाह, मसाप, पुणे)

कार्यवृत्त नोंद : **दीपक करंदीकर**
(कार्यवाह, मसाप, पुणे)

# म.सा.प. इतर शाखा कार्यवृत्त नोंद

## दि. १ ऑक्टोबर २०१८ ते ३१ डिसेंबर २०१८

## महाराष्ट्र साहित्य परिषद, मावळ शाखा

**१. सत्कार कार्यक्रम :** मसाप, मावळचे सभासद साहित्यिकांचा सत्कार करण्यात आला. प्रा. जयंत जोर्वेकर, अमेय गुप्ते, डॉ. प्रमोद बोऱ्हाडे, नंदकुमार नागुलपिल्ले, दीपाली गोकर्ण, डॉ. शाळीग्राम भंडारी व प्रभाकर ओव्हाळ यांचा साहित्यिक योगदानाबद्दल मान्यवरांच्या हस्ते सत्कार करण्यात आला.

**२. पोलंड अनुभव व पोलीश साहित्यात मराठी वाङ्मयाची साम्यस्थळे :** वक्ते : मंदार पुरंदरे

**३. कथावाचन :** शंकर पाटील, व्यंकटेश माडगूळकर, प्र. के. अत्रे यांच्या साहित्यकृतीवर आधारित कार्यक्रम : लेखक व निवेदन श्रीकृष्ण पुरंदरे व वाचन हर्षल आल्पे, देवीदास वझे व श्रीकृष्ण मुळे यांनी विविध कथांचे वाचन केले.

**४. वाचन प्रेरणा दिन : १५ ऑक्टोबर २०१८ :** डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या जन्मदिनानिमित्त वाचनाचे महत्त्व व जीवनातील वाचनाची उपयुक्तता 'वाचन प्रेरणा दिन' म्हणून मसाप, मावळच्या वतीने साजरा केला जातो. या निमित्ताने वाचनसंस्कृती जोपासण्याकरिता मसाप, कार्यवाह यांनी बीजेएस कॉलेजमधील विद्यार्थ्यांकरिता 'अग्निपंख' पुस्तकातील काही उतारे वाचून दाखविले.

**५. अहल्याबाई होळकर यांच्या पुण्यतिथीनिमित्ताने :** तळेगाव दाभाडे येथील अहल्याबाई होळकर युवा मंचाने मसाप, कार्यवाह प्रा. दीपक बिचे यांचे 'पुण्यश्लोक अहल्यादेवीची कर्तबगारी' या विषयावर मसाप, मावळच्या वतीने व्याख्यान आयोजित केलेले होते. प्रा. अंकुश गुंड, नामदेव कुचेकर, त्र्यंबक भेवटे, संपत शेळके व सुमित ठोंबरे उपस्थित होते.

**६. विवेकानंदांच्या जीवनावरील १२५ व्याख्यानांचा संकल्प :** ११ सप्टेंबर १८९३ रोजी योद्धा संन्यासी स्वामी विवेकानंदांनी शिकागोच्या धर्मपरिषदेत हिंदू धर्म व संस्कृती यांचे मंगलगायन आपल्या अमोघ वाणीने करून जगाला मंत्रमुग्ध केले. या महान घटनेला या वर्षी १२५ वर्षे पूर्ण होत आहेत. त्यानिमित्ताने कार्यवाह दीपक बिचे यांनी स्वामी विवेकानंद जीवन चरित्र या विषयावर १२५ व्याख्यानांचा संकल्प केलेला आहे. मसाप, मावळच्या वतीने हा संकल्प राबविला जाणार आहे.

**७. लेखक आपल्या भेटीला :** मसाप, मावळ शाखेचे सभासद व लेखक प्रभाकर ओव्हाळ, प्रा. जयंत जोर्वेकर, डॉ. शाळीग्राम भंडारी, प्रा. दीपक बिचे, श्रीकृष्ण पुरंदरे, श्रीधर दीक्षित, सुरेश अत्रे यांचे मसाप, मावळ व गणेश मोफत वाचनालय व ग्रंथालयाच्या शताब्दी निमित्ताने विविध शाळेत आयोजन करण्यात येणार आहे.

**८. गदिमा जन्मशताब्दी :** गजानन दिगंबर माडगूळकर यांच्या समग्र साहित्याच्या पुस्तिकेचे जन्मशताब्दी निमित्ताने मसाप, मावळच्या वतीने संकलित लेखाच्या रूपाने प्रकाशन डिसेंबर २०१८मध्ये होणार आहे. गदिमांच्या अनेक आठवणींना सुरेश अत्रे यांनी उजाळा दिला. उपाध्यक्ष आशिष पाठक यांनी या प्रकल्पाची सर्व जबाबदारी स्वीकारली आहे.

**९. जाणता राजा महानाट्य :** तळेगाव दाभाडे येथे दिनांक १० ते १५ नोव्हेंबर ते २०१८ रोजी 'जाणता राजा' महानाट्य यशस्वीपणे संपन्न झाले. संकल्पित छत्रपती श्री शिवशंभू स्मारकाच्या निधी संकलनाकरिता आयोजित केले होते. महाराष्ट्र साहित्य परिषद शाखेने या महानाट्याच्या यशस्वितेकरिता विविध जबाबदाऱ्या स्वीकारून यशस्वीपणे पार पाडलेल्या आहेत.

**१०. समर्थ वाङ्मय व त्याच्या वाङ्मय विशेषांकाचे प्रकाशन** योगीराज फाउंडेशनच्या वतीने संपन्न झाले. या विशेषांकाच्या निर्मितीमध्ये संपादकीय संस्करण, प्रकाशन सोहळा, कार्यक्रमाची आखणी, प्रसिद्धी व कार्यक्रम पूर्वतयारी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मावळ शाखेच्या वतीने करण्यात आली. या कार्यक्रमास मसाप, पुणेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे प्रमुख मान्यवर म्हणून उपस्थित होते.

**११. तळेगावात पु. ल. गप्पाष्टक :** महाराष्ट्राचे लाडके व्यक्तिमत्त्व पु. ल. देशपांडे यांच्या जन्मशताब्दी निमित्ताने महाराष्ट्र साहित्य परिषद मावळ शाखेच्या वतीने 'पुल. गप्पाष्टक' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आलेले होते. गायक पंडित विनोदभूषण आल्पे यांनी अनेक आठवणींना उजाळा दिला. सुरेश अत्रे, प्रशांत दिवेकर, श्रीकृष्ण पुरंदरे, प्रा. जयंत जोर्वेकर, प्रा. शिरीष अवधानी, जयश्री जोशी, डॉ. शाळीग्राम भंडारी यांनी एकपात्री अभिनय, नाटककार आदी व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू उलगडले होते.

**११. संविधान दिन :** २६ नोव्हेंबर १९४९ रोजी भारतीय संविधानाचा स्वीकार करण्यात आला. याचे औचित्य साधून दरवर्षी २६ नोव्हेंबर हा दिवस संविधान दिन म्हणून साजरा केला जातो. इयत्ता ११ वी, १२वीमधील विद्यार्थ्यांना मसाप, मावळ शाखेच्या वतीने प्रा. योगेश घोडके यांनी राज्यघटनेची निर्मिती, अंमलबजावणी, स्रोत, महात्मा गांधींच्या विचारांचा प्रभाव, विविध तरतुदी, कलमे व मूलभूत हक्क व कर्तव्ये या मुद्यांवर मार्गदर्शन केले.

**१२. मसाप, कार्याध्यक्षांची मावळ शाखेला भेट :** महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे या मुख्य संस्थेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी मसाप, मावळ शाखेला भेट देऊन संस्थेच्या उपक्रमाचे व प्रकल्पाचे कौतुक केले. संस्थेने ठेवलेल्या विविध नोंद पुस्तके यामध्ये सभा इतिवृत्तांत, जमाखर्च, मुख्य शाखेशी व इतर पत्रव्यवहार, कार्याची प्रसिद्धी, वार्षिक अहवाल व सभेविषयी समाधान व्यक्त केले.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा फलटण

१. महाराष्ट्र साहित्य परिषद फलटण शाखा व जायंटस् वेलफेअर फाउंडेशन, फलटणच्या वतीने मंजुळावाग येथे 'शिवार साहित्य संमेलन' पार पडले. अध्यक्ष विलास वरे होते. रवींद्र बेडकिहाळ, श्री सद्गुरू संस्था समूहाचे प्रमुख दिलीपसिंह भोसले, जायंटस् वेलफेअर फौंडेशनचे अध्यक्ष व संमेलनाचे स्वागताध्यक्ष मोहनराव नाईक निंबाळकर, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे फलटण शाखा अध्यक्ष प्राचार्य रवींद्र येवले, डॉ. नानासाहेब लांडगे, रयतसेवक प्राचार्य शांताराम आवटे यांची प्रमुख उपस्थिती होती.

२. यशवंतराव चव्हाण यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ अवे यशवंतराव चव्हाण मराठी साहित्य संमेलन पार पडले. विनोदी साहित्यिक पु. ल. देशपांडे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त हे संमेलन 'विनोद' या विपयाला वाहिलेले होते. या संमेलनाचे अध्यक्ष खुटवड होते.
या वेळी ना. शेखर चरेगावकर, श्रीमंत कोकाटे, विश्वनाथ पवार, विजय कोलते, डॉ. राजेंद्र माने, दिलीपसिंह भोसले, रवींद्र बेडकिहाळ, सचिन बेडके, दत्ताजीराव बेडके, चंदा जोशी, राहुल कुलकर्णी, रवींद्र येवले उपस्थित होते. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सावेडी

**१. कवितांच्या श्रावणसरींनी श्रोते चिंब :**
महाराष्ट्र साहित्य परिपद व शांतिकुमार फिरोदिया मेमोरियल फाउंडेशनच्या सहकार्याने श्रावणी कवी संमेलन मोठ्या उत्साहात पार पडले. ज्येष्ठ कवी उद्धव कानडे, रानकवी तुकाराम धांडे, कवयित्री प्रा. डॉ. संजीवनी तडेगावकर, भरत दौंडकर आणि कैलास दौंड आदी कवींनी आपल्या विविध रचना या वेळी सादर केल्या. कवी भरत दौंडकर यांनी श्रावणी कविसंमेलनाचे बहारदार सूत्रसंचालन केले.

मसाप सावेडी शाखेच्या वतीने नरेंद्र फिरोदिया यांच्या हस्ते सन्मानचिन्ह, सन्मानपत्र, शाल व पुष्पगुच्छ देऊन उपस्थित कवींचा सत्कार करण्यात आला. या वेळी ज्येष्ठ साहित्यिक डॉ. मधुसूदन बोपर्डीकर, मसाप सावेडी शाखेचे प्रमुख कार्यवाह जयंत येलूलकर, कार्याध्यक्ष भालचंद्र बालटे, उपाध्यक्ष सदानंद भणगे, प्रा. डॉ. संदीप सांगळे, चंद्रकांत पालवे आदी उपस्थित होते. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा दामाजीनगर, मंगळवेढा

**१. १९ मे २०१८ :** भावगीत गायक कै. अरुण दाते यांना श्रद्धांजलीपर 'आठवणीतला शुक्रतारा' हा भक्तिगीतांचा सुरेल कार्यक्रम झाला. त्यात दिगंबर भगरे, सौ. शुभदा जोशी यांनी अरुण दातेंची गीते सादर केली. सूत्रसंचालन प्रा. राजेंद्र जाधव यांनी केले.

**२. २५ जून २०१८ :** 'वाचनालय हे आत्म्याचे ब्युटीपार्लर असते,' असे प्रतिपादन प्रकाश जडे यांनी नगरवाचनालयाने आयोजित केलेल्या पुस्तक प्रदर्शनाचे उद्घाटन करताना केले. अध्यक्षस्थानी ॲड. वसंतराव करंदीकर होते.

**३. ५ जुलै २०१८ :** माध्यमिक व उच्चमाध्यमिक शालांत परीक्षेत मराठी विपयांत तालुक्यात प्रथम आलेल्या विद्यार्थ्यांचा स्मृतिचिन्ह देऊन जि. प. चे मुख्य वित्त लेखा अधिकारी महेश अवताडे यांच्या हस्ते गौरव करण्यात आला.

**४. १३ जुलै २०१८ :** महाकाली कालिदास दिनानिमित्त आपाढस्य प्रथम दिवसे । या शीर्षकाखाली ज्येष्ठ कवयित्री उर्मिला इंगळे (सातारा) यांचे अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले. या संमेलनात प्रा. दत्ता सरगर, गोरक्ष जाधव, हेमंत रत्नपारखी, मधुकर भंडगे, प्रभाकर देशपांडे, डॉ. लता माळी, संगीता मासाळ, रेश्मा गुंगे, किरण घोडके यांनी कविता सादर केल्या. प्रमुख पाहुण्या सौ. अवंती पटवर्धन यांनी कालिदासाच्या काव्यातील सौंदर्यस्थळे उलगडून दाखवली. सूत्रसंचालन बालाजी शिंदे यांनी केले.

**५. २२ जुलै २०१८ :** आपाढी एकादशी निमित्त संतसाहित्याचे अभ्यासक प्रा. विश्वनाथ ढेपे यांचे 'बोलावा विठ्ठल! पाहावा विठ्ठल' या विषयावर प्रवचन झाले. सामाजिक कार्यकर्ते प्रा. पठाण शिवशरण यांचे 'संतांची सामाजिक कामगिरी' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी माजी मंत्री प्रा. लक्ष्मणराव ढोबळे होते. याप्रसंगी शाखा सदस्य सौ. प्रफुल्लता स्वामी यांची इनरव्हिल क्लबच्या अध्यक्षपदी तर दादासाहेब शिवशरण यांची विक्रीकर निरीक्षक म्हणून निवड झाल्याबद्दल सत्कार करण्यात आला.

**६. १ ऑगस्ट २०१८ :** गुरुपौर्णिमेनिमित्त साहित्य-गायन-नाट्य क्षेत्रातील गुरुवर्यांचा सत्कार करण्यात आला.

**७. २७ ऑगस्ट २०१८ :** ज्येष्ठ हिंदी गायक मुकेश यांच्या ४२व्या पुण्यतिथीनिमित्त 'एक शाम मुकेश के नाम' हा हिंदी गीतांचा कार्यक्रम झाला. अंजली किल्लेदार प्रमुख पाहुण्या होत्या.

**८. ८ सप्टेंबर २०१८ :** शिक्षक दिनानिमित्त प्रेरणा प्रतिष्ठानच्या सहयोगाने सौ. सुपमा सुतार, सौ. सुजाता पुजारी, सौ. आशा पाटील (पंढरपूर), साहेबराव महाजन (ठाणे), अविनाश अलदर (सोलापूर) यांना कृतिशील शिक्षक पुरस्कार ज्येष्ठ पत्रकार अरविंद जोशी यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला.

**९. ११ सप्टेंबर २०१८ :** ख्यातनाम मानसतज्ज्ञ. आस्था कौन्सिलिंग सेंटर पुणेचे मयुरेश डंके यांचे 'क करियरचा' या विपयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी जि. प. समाजकल्याण सभापती शिवशरण तर प्रमुख पाहुण्या म्हणून मंजुळा कोळेकर उपस्थित होत्या.

**१०. १२ सप्टेंबर २०१८ :** 'रसिल्या [illegible]' या कार्यक्रमाचे आयोजन न. पा. मंगळवेढाच्या महिला व बालकल्याण सभापती सौ. अनिता नागणे यांचे अध्यक्षतेखाली करण्यात आले होते. या






कार्यक्रमात शाखा अध्यक्ष प्रकाश जडे, सुषमा सुतार, सुजाता पुजारी, गोरक्ष जाधव, ॲड. विनायक नागणे, ॲड. दत्तात्रय तोडकरी, जनार्दन नेने, लहू ढगे, नितीन बाभळे, लक्ष्मण माने, शुभदा जोशी, विश्वास खळवट्टे, नवनाथ सावळे, हर्षवर्धन चव्हाण, रेश्मा गुंगे, हेमंत रत्नपारखी, विद्या माने, संगीता मासाळ, आबाजी जाधव, सुवर्णा काशिद, सुधा मांडवे यांनी कविता, कथा, अनुभव सादर केले.

**११. १४ ऑक्टोबर २०१८ :** वाचक प्रेरणा दिनाचे निमित्ताने रमेश जाधव यांना कै. ज्ञानेश्वर पडानन जडे स्मृती बहुश्रुत वाचक पुरस्कार तर सौ. अवंती पटवर्धन व सिद्धेश्वर इंगळे यांना 'वाचन प्रेरणा' पुरस्काराने नगराध्यक्ष सौ. अरुणा माळी यांचे अध्यक्षतेखाली व रतनचंद शहा बँकेचे चेअरमन राहुल शहा यांचे हस्ते गौरविण्यात आले. या अहवाल काळात कविवर्य नारायण सुमंत, हिंदी-मराठी चित्रपट कलावंत नागेश जरग, अभिनेत्री अश्विनी नवगिरे, अभिनेते सुदर्शन कोळी यांनी शाखेस भेटी दिल्या. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा डोंबिवली

**१. दि. २५ सप्टेंबर २०१८ :** माजी पंतप्रधान भारतरत्न स्व. अटलविहारी वाजपेयी यांना आदरांजली वाहण्यासाठी एका शोकसभेचे आयोजन करण्यात आले. माजी मंत्री जगन्नाथ पाटील, राज्यमंत्री रवींद्र चव्हाण, आबासाहेब पटवारी, सुरेश देशपांडे उपस्थित होते.

**२. ९ सप्टेंबर २०१८ :** रोजी पुण्याचे बंडा जोशी यांनी 'हास्यपंचमी' हा कार्यक्रम सादर केला आणि डोंबिवलीकर श्रोत्यांना खूप हसवले. प्रास्ताविक मसाप, कार्याध्यक्ष सुरेश देशपांडे, आभार कोषाध्यक्ष आनंद गोसावी यांनी केले.

**३. २८, २९ व ३० सप्टेंबर २०१८ :** या तीन दिवशी डोंबिवली मसापचे अध्यक्ष आणि संतसाहित्याचे अभ्यासक, ज्येष्ठ साहित्यिक श्री. वामनराव देशपांडे यांची तीन व्याख्याने आयोजित केली होती.

**२८ सप्टेंबर २०१८ :** विषय : शांता शेळके. या दिवशी कार्यक्रमाचे अध्यक्ष माधव जोशी होते.

**२९ सप्टेंबर २०१८ :** विषय : बालकवी. या दिवशी अध्यक्ष होते आबासाहेब पटवारी.

**३. ३० सप्टेंबर २०१८ :** विषय : शब्दप्रभू ग. दि. माडगूळकर. या दिवशी अध्यक्ष होते ज्येष्ठ गायक वसंतराव आजगावकर. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक सुरेश देशपांडे, सूत्रसंचालन डॉ. धनश्री साने, प्रज्ञा जोशी, डॉ. वृंदा कौजलगीकर यांनी केले. आभार श्री. आनंद गोसावी यांनी मानले. वरील तिन्ही कार्यक्रमात दीपाली काळे, गीता नवरे, आनंद गोसावी या सर्वांनी खूप सहकार्य केले. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा पंढरपूर

**१. दि. २३ डिसेंबर २०१८ :** मसाप शाखा पंढरपूरच्या वतीने ज्येष्ठ इतिहासकार गोपाळराव देशमुख लिखित 'सरदार मल्हारराव होळकर' या ग्रंथाचे प्रकाशन डॉ. द. ता. भोसले यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी मसाप अध्यक्ष नानासाहेब रत्नपारखी होते. या वेळी डॉ. सौ. सुशीला पिंजारी व डॉ. राजेंद्र मगर यांनी सरदार मल्हारराव होळकर यांच्याविषयी माहिती दिली. कार्यक्रमाचे प्रास्ताविक कल्याणराव शिंदे यांनी केले. आभार प्रा. धनाजी चव्हाण यांनी मानले. या वेळी सिद्धार्थ ढवळे, डॉ. विश्वासराव मोरे, डॉ. राजेंद्र जाधव, संभाजी अडगळे, नितीन रत्नपारखी, वा. ना. उत्पात उपस्थित होते.

**२. १९ सप्टेंबर २०१८ : मसाप वर्धापन दिन :** मसाप शाखा पंढरपूरच्या वतीने मसाप शाखा पंढरपूरचा वर्धापन दिन साजरा करण्यात आला. शिवाजीराव बागल, राजेंद्र भोसले, अंकुश गाजरे, गणेश गायकवाड, कवी संभाजी अडगळे, नीळकंठ अत्रे, द्वैपायन वरखेडकर, डॉ. सुचेता कुलकर्णी, रवि सोनार, डॉ. राजेंद्र जाधव, रमेश घळसासी, भक्ती रत्नपारखी उपस्थित होते.

**३. दि. १३ नोव्हेंबर २०१८ : कादंबरीचे प्रकाशन :** मसाप शाखा पंढरपूरच्या वतीने ज्येष्ठ साहित्यिक डॉ. द. ता. भोसले यांच्या वेगळ्या विषयावरील कादंबरीचे प्रकाशन ग्रंथाली प्रकाशनचे दिनकर गांगल यांचे हस्ते करण्यात आले. या वेळी कादंबरीविषयी डॉ. राजेंद्र दास, डॉ. महेंद्र कदम, डॉ. देवानंद सोनटक्के यांनी आपले मनोगत व्यक्त केले. या वेळी सुदेश हिंगलासपूरकर, नानासाहेब रत्नपारखी, सिद्धार्थ ढवळे, गोपाळराव देशमुख, स्वाती भोसले, जयश्री भाकरे, प्राचार्य हणमंत वाघमारे, भास्कर बंगाळे, विविध क्षेत्रातील नागरिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक कल्याणराव शिंदे यांनी केले. आभार प्रा. धनाजी चव्हाण यांनी मानले.

**४. दि. १ डिसेंबर २०१८ : समीक्षा संमेलन व राष्ट्रीय चर्चासत्र :** मसाप पुणे शाखा पंढरपूर व कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालय पंढरपूर यांचे संयुक्त विद्यमाने समीक्षा संमेलन व राष्ट्रीय चर्चासत्राचे आयोजन बॅरिस्टर पी. जी. पाटील सभागृहात आयोजित करण्यात आले होते. संमेलनाचे अध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले हे होते, तर उद्घाटन वसंत आबाजी डहाके यांचे हस्ते करण्यात आले. स्वागताध्यक्षपदी आमदार भारतनाना भालके तर आमदार दत्तात्रय सावंत हे विशेष उपस्थित होते. या वेळी प्राध्यापक मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, सौ. सुनीताराजे पवार, शिरीष चिटणीस, तानसेन जगताप, डॉ. शशिकला पवार, वि. दा. पिंगळे, राजन लाखे, राजन मुठाणे, पद्माकर कुलकर्णी, रावसाहेब पवार, उद्धव कानडे, निमंत्रक सुरेश देशपांडे, प्रभाकर संत, पुरुषोत्तम काळे, प्राचार्य अशोक भोईटे उपस्थित होते. प्रा. डॉ. द. ता. भोसले यांची मुलाखत विशेष गाजली. 'आजची समीक्षा समकालीन साहित्याला न्याय देते काय?' या विषयावर परिसंवाद घेण्यात आला. अध्यक्षस्थानी डॉ. महेंद्र कदम होते. पुरुषोत्तम काळे, डॉ. राजशेखर शिंदे, डॉ. सुहास पुजारी यांनी आपले विचार व्यक्त केले.



अनुक्रमणिका





डॉ. नागनाथ गायकवाड यांचे अध्यक्षतेखाली रिसर्च पेपरचे वाचन करण्यात आले. समारोप समारंभात मनोरमा परिवाराचे श्रीकांत मोरे, शिरीष चिटणीस, नागनाथ कोत्तापल्ले, प्रकाश पायगुडे, अशोक भोईटे उपस्थित होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक डॉ. देवानंद सोनटक्के यांनी केले, तर स्वागत कल्याणराव शिंदे यांनी केले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड

**१. दि. १५ ऑक्टोबर २०१८ : वाचन प्रेरणा दिन :** प्राचार्य डॉ. वेदश्री थिगळे महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'वाचन प्रेरणा दिन-२०१८'च्या प्रमुख अतिथी होत्या. शाखेचे उपाध्यक्ष दत्ता गायकवाड, कार्यवाह रवींद्र मालुंजकर आणि श्रीमती सुरेखा गणोरे उपस्थित होते.

कार्यक्रमास कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, म.न.पा. प्रभाग सभापती पंडित आवारे, जिल्हा प्रतिनिधी ॲड. नितीन ठाकरे, व्यापारी बँकेचे संचालक निवृत्ती अरिंगळे व सुधाकर जाधव, कार्यकारिणी सदस्य दशरथ लोखंडे व शिवाजी म्हस्के, नि. जि. न्या. वसंत पाटील, कवी देविदास खडताळे, लेखक श्रीराम गायकवाड, कवी प्रशांत कापसे आदी उपस्थित होते.

**२. दि. २९ सप्टेंबर २०१८ : 'संवाद सृजनाशी– पुष्प १४वे' श्री. वसंत खैरनार :** प्रसिद्ध प्रकाशक, वितरक मा. वसंत खैरनार यांनी या मालिकेतील १४ वे पुष्प गुंफले. शाखा सभासद पांडुरंग गायधनी यांनी स्वागत केले.

कार्यक्रमाला उत्तम प्रतिसाद लाभला. कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, सावानाचे प्रमुख कार्यवाह श्रीकांत बेणी, अनमोल पुस्तकालयाचे सोमनाथ राठी, कोषाध्यक्ष सुदाम सातभाई, कार्यकारिणी सदस्य प्रशांत केंदळे, शिवाजी म्हस्के, सुजाता हिंगे, सुरेखा गणोरे, श्रीकांत पाटील, कवी देवीदास खडताळे आदी उपस्थित होते.

महाराष्ट्र साहित्य परिषद - शाखा नाशिकरोडने 'कांदा भाव - समस्या आणि उपाय' या ज्वलंत विषयावर निमंत्रितांचे चर्चासत्र आज सोमवार दि. १० डिसेंबर २०१८ रोजी हॉटेल ग्रेपसिटी, दत्त मंदिर चौक, नाशिकरोड, नाशिक येथे आयोजित केले होते.

चर्चासत्रात मुंबई उच्च न्यायालयाचे नि. न्यायमूर्ती तथा महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरणाचे विद्यमान अध्यक्ष मा. ना. न्या. श्री. अंबादासजी जोशी साहेब, कृषी संशोधक डॉ. सतीश श्रीवास्तव, नाफेड नवी दिल्लीचे संचालक श्री. नानासाहेब पाटील, शेतकरी संघटनेचे कृषी विचारवंत डॉ. गिरीधर पाटील, कृषी तज्ज्ञ प्रा. अशोक सोनवणे, उपविभागीय कृषी अधिकारी श्री. दिलीप देवरे, 'आत्मा'चे कृषी अधिकारी श्री. कैलास शिरसाठ, दै. 'महाराष्ट्र टाइम्स'चे निवासी संपादक श्री. शैलेन्द्र तनपुरे, दै. 'सकाळ'चे कृषी प्रतिनिधी श्री. महेंद्र महाजन, दै. 'लोकमत'चे कृषी वार्ताहर श्री. शेखर देसाई, 'ॲग्रोवन' नाशिकचे संयोजक श्री. ज्ञानेश उगले, दै. 'दिव्य मराठी'चे कृषी वार्ताहर श्री. सचिन वाघ आणि शाखा कार्याध्यक्ष श्री. उन्मेष गायधनी, उपाध्यक्ष श्री. दत्ता गायकवाड, जिल्हा प्रतिनिधी श्री. नितीन ठाकरे, कार्यकारी मंडळाचे सदस्य श्री. दशरथ लोखंडे व श्री. शिवाजी म्हस्के यांनी भाग घेतला.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा दामाजीनगर

**१. साहित्य चळवळीला बळ आणि दिशा देणारा दामाजीनगर शाखा मेळावा :**

दामाजीनगर (मंगळवेढा) या संतनगरीतल्या या शाखा मेळाव्याची सुरुवात स्वाभाविकपणे संत दामाजीपंतांच्या मंदिरातून ग्रंथदिंडीने झाली. या ग्रंथदिंडीचा प्रारंभ रतनचंद शहा अर्बन बँकेचे चेअरमन राहुल शहा यांचे हस्ते झाला. या प्रसंगी दामाजीनगर शाखेचे पदाधिकारी व सर्व सदस्य मोठ्या संख्येने एकसारख्या वेषभूषेत उपस्थित होती. खुद्द म.सा.प. पुणे शाखेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, कार्यवाह प्रकाश पायगुडे, हास्यपंचमीकर बंडा जोशी, विभागीय सचिव कल्याण शिंदे, सोलापूर जिल्हा प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी यांनी ग्रंथपालखी खांद्यावर घेऊन संत चोखामेळा-दामाजी पुतळ्यास पुष्पहार घातले व शहरात तीन किलोमीटर अंतर दिंडीबरोबर चालले. दिंडीत महिलांनी भजने गायली. टाळ मृदंगाच्या नादात फेरफुगड्या घातल्या. अगदी आनंदाच्या डोही आनंद तरंग उभे केले.

ग्रंथदिंडी ज्ञानदीप संकुलात पोहोचल्यावर प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, पद्माकर कुलकर्णी, कल्याण शिंदे, मेळाव्याचे स्वागताध्यक्ष ॲड. नंदकुमार पवार, नगराध्यक्षा अरुणा माळी यांनी स्वतः म.सा.प. दामाजीनगर शाखेची सभासद असल्याचा अभिमान व्यक्त करून साहित्य चळवळीस सर्वतोपरी सहकार्य करणार असल्याचे सांगितले. स्वागताध्यक्ष ॲड. नंदकुमार पवार यांनी संतसाहित्य, उज्ज्वल इतिहास, नाट्य, कृषिक्षेत्र, उत्खनन यांचा देदीप्यमान इतिहास कथन केला. शाखाध्यक्ष जडे यांनी प्रास्ताविकात शाखेच्या विविध उपक्रमांचा आढावा घेऊन मान्यवरांचे स्वागत केले.

या मेळाव्याचे सूत्रसंचालन प्रा. राजेंद्र जाधव, सौ. स्मिता जडे व बालाजी शिंदे यांनी केले. ईशस्तवन सौ. शुभदा जोशी यांनी तर शेवटी पसायदान सौ. स्मिता जडे यांनी गायले. प्रा. विश्वनाथ ढेपे यांच्या आभार प्रदर्शनाने मेळाव्याची सांगता झाली. हा मेळावा यशस्वी करण्यासाठी यतिराज वाकळे (कार्याध्यक्ष), बालाजी शिंदे, संभाजी सरगर (कार्यवाह), अशपाक काझी (कोषाध्यक्ष), दिगंबर भगरे, प्रा. विश्वनाथ ढेपे, प्रा. पठाण शिवशरण, लहू ढगे, संगिता मासाळ, सुषमा सुतार, प्रफुल्लता स्वामी, रेखा जडे, सौ. तेजस्विनी कदम, सुधा मांडवे, धनंजय पाटील, दया वाकडे, गोरक्ष जाधव, रेश्मा गुंगे, मयूर हजारे यांनी विशेष परिश्रम घेतले.





अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा पिंपरी-चिंचवड

१. महाराष्ट्र साहित्य परिषद, पिंपरी चिंचवड शाखेतर्फे महाराष्ट्र दिन व कामगार दिनानिमित्त दि. २ मे २०१८ रोजी 'मराठी आणि कामगार' या विषयावरील 'काव्यसंमेलन' आयोजित करण्यात आले. सदर कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे म्हणून पिंपरी चिंचवडचे माजी नगरसेवक अरुण बोऱ्हाडे उपस्थित होते. सदर कार्यक्रमाचे प्रास्ताविक राजन लाखे यांनी केले, तर कार्याध्यक्ष विनिता ऐनापुरे यांनी आभार मानले. सौ. माधुरी मंगरूळकर यांनी सूत्रसंचालन केले. सदर कविसंमेलनामध्ये ३० कवींनी सहभाग घेतला.

२. 'जीवन गौरव' मासिक औरंगाबाद आणि महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड यांच्या वतीने दि. ५ जून २०१८ पहिले राज्यस्तरीय शिक्षक साहित्य संमेलन आयोजित करण्यात आले. सदर संमेलनाचे अध्यक्षपद राजन लाखे यांनी भूषविले. प्रमुख पाहुणे मसाप पुणेच्या कोषाध्यक्षा सौ. सुनीताराजे पवार, जीवनगौरवचे प्रमुख रामदास वाघमारे, सचिव डी.बी. शिंदे, नागेश शेवाळकर, राजश्री पल्लेवाड आदी मान्यवर उपस्थित होते.

३. महाराष्ट्र साहित्य परिषद चिंचवड व ज्येष्ठ नागरिक संघ यमुनानगर निगडी यांच्या संयुक्त विद्यमाने दि. ५ जुलै २०१८ 'अंधश्रद्धा निर्मूलन- आजची गरज' या विषयावर डॉ. राजेंद्र कांकरिया यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले. या वेळी मसाप पिं. चिं.चे अध्यक्ष राजन लाखे, यमुनानगर ज्येष्ठ नागरिक संघाचे अध्यक्ष पी. टी. यरगट्टीकर, विनिता ऐनापुरे, अपर्णा मोहिले, किरण लाखे, डॉ. रजनी शेठ, प्रमोद येवलेकर, अश्विनी रानडे, सरला येवलेकर, विनिता श्रीखंडे आदी उपस्थित होते. हवेतून सोन्याची साखळी काढणे, हाताचा स्पर्श गोड होणे हे प्रात्याक्षिकाद्वारे दाखवून लोकांची कशी फसवणूक होते हे डॉ. कांकरिया यांनी स्पष्ट केले. सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन संजय जगताप यांनी केले.

४. महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेने दि. ७ जुलै २०१८ रोजी आषाढीवारीमध्ये सहभागी होऊन सकाळ वृत्तपत्राच्या 'साथ चल' या उपक्रमास पाठिंवा देऊन आपला सहभाग नोंदविला.

५. दि. २२ जुलै २०१८ महाराष्ट्र साहित्य परिषद चिंचवड शाखा आणि प्रतिभा महाविद्यालय चिंचवड यांच्या संयुक्त विद्यमाने 'पाऊस' या विषयावरील गाणी व काव्य संमेलन प्रतिभा महाविद्यालय येथे आयोजित करण्यात आले. या कार्यक्रमांच्या अध्यक्षस्थानी उद्योजक कैलास आवटे होते. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे शाखाध्यक्ष राजन लाखे, कार्याध्यक्षा विनिता ऐनापुरे उपस्थित होते. सदर कार्यक्रमात कवी दिनेश भोसले, शशिकला देवकर, आय. के. शेख, मधुश्री ओव्हाळ, वावू डिसोजा, डी.वी. शिंदे, रघुनाथ पाटील, संगीता व्होरा इत्यादींसह ५५ कवींनी सहभाग नोंदविला. सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन विनिता श्रीखंडे व पुष्पा नगरकर यांनी तर दीपक अमोलिक यांनी संयोजन केले.

६. दि. २८ जुलै २०१८ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद पिं.चिं. व स्वरप्रतिभा यांच्या संयुक्त विद्यमाने गुरुपौर्णिमेनिमित्त 'स्वरसंध्या' हा कार्यक्रम सावरकर भवन निगडी येथे आयोजित करण्यात आला. त्यामध्ये गायिका सायली सांभारे व अविनाश लेले यांनी गायलेल्या भावगीत, कविता व भक्तिगीतांनी रंगत आणली.

या वेळी ज्येष्ठ गायक मधू जोशी, नगरसेवक अमित गावडे, राजन लाखे, विनिता ऐनापुरे, शिक्षणतज्ज्ञ वा. ना. अभ्यंकर, मकरंद बापट, वसंत गुजर, संजीवनी पांडे, वावू डिसोजा, किरण लाखे उपस्थित होते.

७. दि. १० सप्टेंबर २०१८ रोजी मराठी साहित्य व कला मंडळ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने ज्ञानपीठ पुरस्कारप्राप्त विंदा करंदीकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त 'विंदा व त्यांची प्रतिभा' या विषयावर राजन लाखे यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. 'साहित्य सेतू' संस्थेचे लेखक क्षितिज पाटुकले, 'अनुबंध' प्रकाशनाचे अनिल कुलकर्णी हे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. अपर्णा मोहिले, बावू डिसोजा, अश्विनी रानडे, प्राची देशपांडे, नितीन सुतार, दिगंबर शिंदे, माधुरी डिसोजा, सीमा गांधी, नागेश गावड, मंगला पाटसकर, रुचिता देशपांडे इ. मान्यवर उपस्थित होते. सौ. माधुरी मंगरूळकर, पुष्पा नगरकर, दीपक अमोलिक यांनी या कार्यक्रमाचे यशस्वी संयोजन केले. संजय जगताप यांनी सूत्रसंचालन केले तर विनिता ऐनापुरे यांनी आभार मानले.

८. महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेने दि. १७ ऑगस्ट २०१८ रोजी तनुजा इनामदार आणि पूर्णिमा नार्वेकर निर्मित 'मनभावन' हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. कार्यक्रमाच्या सुरुवातीला राजन लाखे, विनिता ऐनापुरे, संजय जगताप, माधुरी मंगरूळकर, दीपक अमोलिक, किरण लाखे, प्राची देशपांडे या सदस्यांनी माजी पंतप्रधान अटलविहारी वाजपेयी यांच्या कवितांचे वाचन करून त्यांना श्रद्धांजली अर्पण केली. इनामदार आणि नार्वेकर यांनी मनभावन या कार्यक्रमात विविध विषयावरील विविध कवितांचे सादरीकरण केले.

९. महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेने ९ सप्टेंबर २०१८ रोजी शिक्षक दिनाचे औचित्य साधून 'शिक्षक कविसंमेलन' आयोजित केले. सदर कविसंमेलनामध्ये ४२ शिक्षक-कवींनी सहभाग घेऊन कार्यक्रमाची शोभा वाढविली.

१०. महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेने दि. ११ सप्टेंबर २०१८ रोजी ना. सी. फडके यांच्या शतकोत्तर रौप्यमहोत्सवी वर्षाचे औचित्य साधून 'ना. सी. फडके एक अवलोकन' या कार्यक्रमाचे आयोजन केले. सदर विषयावर ज्येष्ठ साहित्यिका अपर्णा मोहिले यांनी आपले विचार मांडले. श्री. प्राचार्य गुलाबराव देशमुख सदर कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. कार्यक्रमाच्या दुसऱ्या सत्रात ना. सी. फडके यांच्या 'जादूगार' या कादंबरीतील निवडक उताऱ्यांचे अभिवाचन झाले, यात डॉ. रजनी शेठ, माधुरी मंगरूळकर, संगीता व्होरा यांनी सहभाग घेतला.

●

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : December 2018
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category.    Publishing Date : 31 December 2018



बुक-पोस्ट

प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

